मितीनें बक्षिसें दिल्ल्या

ची माला.

बर १०.

# लघुनिबंधमाला

(पुणें इसवी सन १८६६–शके १७८८)

हे लहानसें पुस्तक

अनेक इंग्लिश ग्रंथांच्या आधारानें रचून दक्षिणा

प्रैज कमेतीस नजर केलें.

तें

रेक्टर आफ् पब्लिक इन्... ध्यान व ...

...ज कमिटीचे अध्यक्ष यांच्या आज्ञेवरून

विष्णु परशुराम शास्त्री पंडित

यांनीं तपासलें व

मुंबईंत

इंदुप्रकाश छापखान्यांत छापून प्रसिद्ध

केलें.



... १८७६–शके १७९८.

(... २५ व्या आक्टाप्रमाणें नोंदला आहे.)

किंमत ९ आणे.

Dakshina Prize Book Series.

No. 10.

---

# LAGHUNIBANDHAMÂLÂ

OR

## A SERIES OF SHORT ESSAYS

THIS LITTLE BOOK WAS COMPILED WITH THE AID OF SEVERAL ENGLISH WORKS AND WAS PRESENTED TO THE DAKSHIṆA PRIZE COMMITTEE.

REVISED BY

VISHṆU PARASHURÁM SHÁSTRI PAṆḌIT

WITH THE PERMISSION OF

THE DIRECTOR OF PUBLIC INSTRUCTION AND THE PRESIDENT OF THE DAKSHIṆÁ PRIZE COMMITTEE

AND

PRINTED AND PUBLISHED

IN THE "INDU-PRAKASH" PRESS.

Bombay:

---

1876

---

*( Registered under Act XXV, of 1867. )*

*Price Annas Nine.*

दक्षिणा प्रैज कमितीनें बक्षिसें दिलेल्या
ग्रंथांची माला.

नंबर १०.

---

# लघुनिबंधमाला

(पुणें इसवी सन १८६६—शके १७८८)
हें लहानसें पुस्तक
अनेक इंग्लिश ग्रंथांच्या आधारानें रचून दक्षिणा
प्रैज कमेतीस नजर केलें,

तें

मे. दैरेक्तर आफ् पब्लिक इन्स्त्रक्शन व मे. दक्षिणा
प्रैज कमितीचे अध्यक्ष यांच्या आज्ञेवरून

विष्णु परशुराम शास्त्री पंडित

यांनीं तपासलें व

मुंबईंत

इंदुप्रकाश छापखान्यांत छापून प्रसिद्ध
केलें.

---

इसवी सन १८७६—शके १७९८.

---

(हा ग्रंथ १८६७ च्या २५ व्या आक्टाप्रमाणें नोंदला आहे.)

किंमत ९ आणे.

# प्रस्तावना.

---

मनोरंजन आणि बहुश्रुतपणा ह्या दोन्ही गोष्टी मनुष्याच्या सुखास आवश्यक आहेत. आणि त्यांचा थोडासा तरी पुरवठा आपणाकडून जनांस व्हावा, ह्या हेतूनें हें पुस्तक लिहिलें आहे. सुज्ञ जन, यांतील दोषांविषयीं क्षमा करून, गुणलेशाचें सेवन करितील, अशी मला पूर्ण आशा आहे. ती त्यांनीं कृपा करून पुरवावी. हीच प्रार्थना आहे.

ग्रंथकर्त्ता.

# अनुक्रमणिका.

# लघुनिबंधमाला.

## ज्ञान.

ह्या लोकीं मनुष्याची कीर्ति होण्यास विद्या, शौर्य व संपत्ति इत्यादि अनेक कारणें आहेत. त्यांत विद्या किंवा ज्ञान ह्यांच्या योग्यतेस दुसरें कोणतेंही पात्र नाहीं. शूर परदेश जिंकून स्वदेशाचें हित करितो खरें; परंतु तें दुसऱ्याच्या घातास प्रवृत्त झाल्यावांचून त्याला साधत नाहीं. द्रव्यवान् होणाऱ्याचेंही प्रायः तसेंच आढळतें. पण ज्ञानी पुरुषाची मात्र गोष्ट तशी नाहीं. तो लोकांस सुखप्रद व पूज्य होण्यास त्याला कोणाचा घातपात करणें नको. तो विचारमग्न होऊन जे नियम व सिद्धांत शोधून काढितो ते सर्वांस सुखप्रद होतात व तेणें करून त्याची कीर्तिहि होते. शूर, धनिक इत्यादिकांची कीर्ति, ते उभे असतात तोंपर्यंत अथवा त्यांच्या पश्चात् त्यांचीं कृत्यें जनांच्या डोळ्यांपुढें किंवा मनांत असतात तोंपर्यंत मात्र त्यांच्या देशीं असते; आणि ते केवळ आपल्याच देशाच्या उपयोगीं पडतात. परंतु विद्वान् पुरुषांचे विचार व सिद्धांत मनुष्यास हमेषा हितावह होत असल्यामुळें त्यांची कीर्ति चिरकाल सर्वत्र राहते, आणि ते सर्व देशांच्या उपयोगीं पडतात. ह्यावरून सर्व कीर्तिमान् व उपयुक्त पुरुषांमध्यें विद्वान् श्रेष्ठ आहेत हें सहजच स्पष्ट होतें व तें उदाहरणांनींही सिद्ध करतां येईल.

पहा; महमूद, अकबर, सीझर, शिकंदर इत्यादि जे महापराक्रमी धनत्तर भूपाळ पूर्वी होऊन गेले त्यांच्या कृत्यांचा हल्लींच्या लोकांस कांहीं तरी उपयोग आहे काय? नाहीं; बिलकूल नाहीं असें म्हटलें तरी शोभेल. आतां विद्वानांच्या कृत्यांकडे लक्ष्य द्या. पैथागरस नामें कोणी महाज्ञानी मागें होऊन गेला त्यानें, युक्लीडच्या रेखागणितांतील प्रथम पुस्तकाचा सत्तेचाळिसावा सिद्धांत सिद्ध केला, त्याजवर सगळें नौकानयन रचिलें आहे. त्या शास्त्रापासून हल्लीं अनेक देश पृथ्वीमध्यें एकमेकांशीं व्यापार करूं लागले आणि ते संपत्तिमान् व सुखी झाले आहेत. तेव्हां ह्या संपत्तीचा व सुखाचा मूळदाता पैथागरस आहे, हें कोणीही विचारी पुरुष नाकबूल करणार नाहीं.

इतर गोष्टींनीं झालेल्या कीर्तीपेक्षां ज्ञानसंपन्नतेपासून झालेली कीर्ति महापराक्रमी राजांस देखील अधिक वाटते. ते लढाया, हल्ले, तह, राज्यकारभार इत्यादि कामें वेळच्यावेळीं योग्य रीतीनें आटोपून फावल्या वेळांत ज्ञानप्राप्तीचा उद्योग फार उत्कंठेनें करितात; याचीं उदाहरणेंही इतिहासांत विपुल आढळतात. पहा, सीझर प्रत्यहीं निदान एक प्रहर तरी विद्याभ्यासाकडे घालवीत असे. शिकंदर बादशाहा तर उघडपणें असें ह्मणे कीं, "माझा पिता जो फिलिप राजा त्यानें मला जरी जन्म व राज्य दिलें आहे, तरी त्यापेक्षां माझा ज्ञानदाता पूज्य गुरु जो ऑरिस्तातल, त्याचे मी फार उपकार मानितों." आणखी त्यानें आपल्या गुरूस लिहिलेलें एक पत्र लोकप्रसिद्ध आहे. त्यावरून

आपणांस इतरांहून अधिक ज्ञानी ह्मणून घेण्यास तो किती जपत होता हें लक्षांत येईल. तें पत्र येणेंप्रमाणें:—

" गुरुमहाराज,

आपल्या निवडक उत्कृष्ट ज्ञानाचें पुस्तक आपण लोकप्रसिद्ध केलें हें नीट केलें नाहीं. कारण, इतर लोकांहून मी अधिक शाहणा ठरण्यास आतां त्याच्यापेक्षां अधिक असें मजपाशीं कांहींच नाहीं. जें तुह्मीं माझ्या पोटीं ठेविलें होतें तें आतां सर्वांच्या ओटीं झालें. असो; सत्ताबलापेक्षां शहाणपणानें म्या इतरांस दिपवावें असें माझ्या मनांत होतें. अस्तु; कृपा असावी हीच विनंती. "

आतां विचार करा. शिकंदरबादशाह सर्व ऐहिक सुखांचा उपभोग घेत असतांही त्याला ज्ञानसंपन्न होण्याची इतकी इच्छा होती; तेव्हां त्यांत कांहीं अलौकिक सुख आहे याविषयीं संशय नको. मनुष्य कोणत्याही स्थितींत असला, तरी ज्ञान त्याला उपयोगाचें आहे. ज्ञानानें बालपणीं सन्मार्ग समजतो; मध्यम वयांत द्रव्य व कीर्त्ति यांचा लाभ होतो; आणि उत्तरदशेमध्यें सारासार विचार कळून सर्व जन्माचें सार्थक्य करणारें व चित्तास समाधान आणि शांति देणारें जें परमेश्वराचें ध्यान त्यांत मन रंगून जातें. आणखी काय पाहिजे?

अभंग.

ज्ञानाविण जे जे कळा, ते ते जाणावी अवकळा ॥ १ ॥
ऐसें भगवंत बोलिला, चित्त द्यावें त्याच्या बोला ॥ २ ॥

एके ज्ञानेंचि सार्थक, सर्व जन्म निरर्थक ॥ ३ ॥
दास म्हणे ज्ञानाविण, प्राणि जन्मला पाषाण ॥ ४ ॥

**रामदास.**

---

## देशाटन.

देशाटन हें ज्ञानसंपादनाचें एक उत्कृष्ट साधन आहे. ज्या देशाची भाषा आपणांस येत नाहीं त्यांत आपण प्रवासास जाऊं नये. पण ती भाषा जाणणारा व त्या देशाचा माहितगार असा कोणी सोबती किंवा शिक्षक बरोबर असला तर मग तेथें जाण्यास हरकत नाहीं. कारण, तेथें कोणकोणत्या गोष्टी पाहण्यासारख्या आहेत व कोणकोणाच्या भेटी घेतल्या असतां आपलें हित होईल हें तेथें गेल्यावर त्याजकडून आपणास विचारून घेतां येईल. जातेवेळीं त्या देशाच्या वर्णनाचीं पुस्तकेंही बरोबर घ्यावीं. प्रथमतः त्यांतल्या राजधानीस जावें आणि तेथचीं देवालयें, पुस्तकालयें, पाठशाळा, न्यायसभा, प्रधानसभा, राजसभा, व्याख्यानगृहें, नाट्यशाळा, मोठ्या इमारती, वेशी, किल्ले, वखारी, बंदरें, बाजार, प्राचीनशिलालेख, बागबगीचे, सामान तयार करण्याचे कारखाने व लोकांच्या प्रशस्त कर्मणुकीचीं स्थळें इत्यादि स्थानें जातीनें नीट लक्ष्यपूर्वक पाहावीं. तेथील लोकांचीं लग्नें, कार्यें, क्रियाकर्मांतरें, व्यापार, धर्म व स्वभाव यांची माहिती करून घ्यावी. बरोबरच्या पुस्तकांवरून आणखी कांहीं शोध करावा. शहराच्या एका टोंकास कांहीं दिवस राहून

मग दुसऱ्या टोंकास विऱ्हाड घ्यावें आणि हमेषा लोकांत मिसळून असावें, ह्मणजे चाली रीतींची बरोबर माहिती होईल. विद्वान् व श्रीमान् लोकांच्या भेटी घ्याव्या व त्यांशीं नम्रपणानें वागून त्यांची मर्जीही संपादावी. त्यांजपासून तेथच्या राज्यव्यवस्थेचें व लोकांच्या अंतर्गत स्थितीचें ज्ञान प्राप्त करून घ्यावें. ज्या ज्या दिवशीं जें जें नवें आढळेल, तें तें त्या त्या दिवशीं आपल्या स्मरणवहीवर तपशीलवार लिहून ठेवावें. नंतर स्वदेशीं जावें आणि आपण मिळविलेली नवी माहिती आपल्या देशबंधूंच्या कानीं पडेल अशा रीतीनें प्रसिद्ध करावी. परदेशांत केलेल्या नव्या मित्रांस पत्रें पाठवून त्यांचीं उत्तरें मागावीं, आणि त्यांच्या द्वारें नवी माहिती आणून लोकांस कळवावी. ही देशाटनाची उत्कृष्ट रीति होय.

---

## विचार.

इंग्लंडामध्यें सर थामस मूर ह्मणून एक विख्यात पुरुष पूर्वीं होऊन गेला. त्याला प्रथमतः एक मुलगी मात्र होती. ह्मणून त्याची बायको पुत्रासाठीं नवस सायास करीत असे. पुढें तिला एक मुलगा झाला. तो वयांत आला तरी अगदी वेडगळच होता. त्यास पाहून मूरसाहेब आपल्या पत्नीस एके दिवशीं असें बोलला कीं, “अग, तूं मुलगा मुलगा करीत होतीस तो हा तुझा मुलगा. अखेरपर्यंत मुलगाच राहणार बरें !” ह्या गोष्टीचें तात्पर्य असें कीं, मनुष्य शरीरानें कितीही पुष्ट झाला, अथवा वयानें वाढला तरी विचारानें त्याचें

अन प्रशस्त झाल्यावांचून त्यास खरा मनुष्यपणा येत नाहीं ही गोष्ट खरी आहे. मनुष्य आणि इतर प्राणी ह्यामध्यें जें आज जमीनअस्मानाचें अंतर आहे त्याचें कारण केवळ विचार करण्याची शक्ति हें होय. फक्त शरीरसाधनांचा विचार करूं लागलों तर वाघ, सिंह, हत्ती, गेंडे इत्यादि अनेक जातींचे प्राणी आपणां मनुष्यांपेक्षां अधिक शक्तिमान् आहेत; पण त्यांच्या टापेंत मनुष्य कधीं राहिला आहे काय? नाहीं. यावरून त्या पशूंचीं स्थूल शरीरें, विक्राळ रूपें, भयंकर शब्द, प्रखर नखें यमस्वरूप जवडे आणि बारबारा हात उडी मारण्याचें सामर्थ्य हीं सर्व साधनें मनुष्याच्या एका विचारशक्तीपुढें अगदी दुर्बल होऊन गेलीं आहेत असें सहजच लक्षांत येईल.

मनुष्य इतक्या उच्च स्थितीस पोहोंचण्यास केवळ त्याची विचारशक्तीच कारणीभूत झाली आहे. हजार वर्षांमागें ह्या किंवा दुसऱ्या कोणत्याही देशांतील पशुपक्ष्यांची जी स्थिति होती तीच हल्लीं सर्वत्र आढळून येते. परंतु इ० स० ८५० सालीं मनुष्यांची जी स्थिति होती तिजहून १८५० तील मनुष्यांची स्थिति अगदी भिन्न होती ह्मणजे प्राचीन काळचे लोक झाडाचीं पानें नेसत, नानाप्रकारच्या वृक्षरसांनीं अंगें रंगवीत, ओबड धोबड झोंपड्यांत राहात, कंदमूलें व शिकार यांजवर निर्वाह करीत आणि खाणें पिणें व निद्रा यांत सगळा वेळ घालवीत; परंतु हल्लींची लोकस्थिति अगदी भिन्न आहे. पाहा, ते उत्कृष्ट तऱ्हेचीं बारीक वस्त्रें पांघरतात; केशरादिकां

च्या उटया लावून, व सोन्यारुप्याचे अलंकार घालून आपलीं शरीरें शोभवितात; खैर व सागवान इत्यादिकांच्या लाकडांनीं व सफेदार गुळगुळीत दगडांनीं बांधलेल्या छानदार वाड्यांत राहतात; मधुर, रुचकर, सुवासिक आणि पौष्टिक असें अन्न खातात आणि शेतकी, व्यापार, नौकरी, ग्रंथावलोकन, ईश्वरभजन, इत्यादि कर्मांत कालक्रमण करितात. सारांश सांगावयाचा इतकाच कीं, प्राचीन काळच्या लोकांपेक्षां हल्लींचे लोक बहुत प्रकारांनीं सुखी व शाहणे आहेत; व त्यांचें शहाणपण व सुख हीं उत्तरोत्तर वाढत चाललीं आहेत. तसा प्रकार पशुपक्ष्यांत बिलकूल आढळून येत नाहीं. सृष्ट्युत्पत्तीपासून आजपावेतों त्यांच्या स्थितींत तिळभरही फरक पडला नाहीं, व पुढें कधीं पडेल असेंही वाटत नाहीं. तर यावरून हें कोणीही कबूल करील कीं, इतर प्राण्यांस वर्जून फक्त मनुष्यास जगदीश्वरानें जी अमौलिक विचारशक्ति दिली आहे तिच्याच योगानें तो या जगीं सर्वांचा धनी होऊन बसला आहे.

मनुष्याचें मन प्रायः कधीं रिकामें असत नाहीं. त्याचा कांहींना कांहीं विचार चाललेला असतो. परंतु तो विचार चांगला आहे कीं वाईट आहे, आपल्या हातून सिद्धीस जाईल किंवा नाहीं व त्याचा परिणाम कसा होईल इत्यादि गोष्टी विचारी पुरुषानें प्रथमतः लक्षांत आणाव्या. नाहीं तर विचारापासून संकट प्राप्त होण्याचा संभव आहे. यास्तव दूरवर नजर पोहोंचवून सद्विचार केला पाहिजे. विद्या, धन, कीर्ति, अधि-

कार व तेज ह्या गोष्टी इहलोकीं विचारापासून मनुष्यास प्राप्त होतात; आणि जन्माचें सार्थक्य करणारें व मरणोत्तर सुखप्रद जें जगदीशाचिंतन, त्यांत मन रंगून जातें, ह्मणून सर्वदा चांगला विचार करण्याची संवय ठेवणें हेंच सत्पुरुषास उचित आहे.

---

## समाधान.

मनुष्यें पृथ्वीच्या पृष्ठभागावर सहस्रशः जीं बरीं किंवा वाईट कर्मे करितात त्या सर्वांचा हेतु एकच असतो. हें म्हणणें प्रथमतः अगदी अप्रमाण वाटेल; परंतु सूक्ष्म विचारांतीं त्याची सत्यता लक्षांत येईल. पाहा, तपस्वी तप करितो आणि तस्कर चोरी करितो हीं कर्में न्यायदृष्टीनें पाहतां जरी एकमेकाशीं प्रतिकूल अथवा उलटीं दिसतात, तरी त्यांचे परिणाम त्याच्या त्याच्या कर्त्यांच्या मनांवर अगदी एकसारखे होतात. ते असे.— तपस्वी जी कामना धरून तप करितो ती त्याच्या हातून सिद्धीस गेली म्हणजे त्याला आपण कृतकृत्य झालों असें वाटून समाधान होतें. त्याप्रमाणेंच तस्करास चौर्यकर्मांत त्याच्या इच्छेसारखें फळ आलें म्हणजे आपण आज मोठी जोड मिळविली असें समजून तो फार संतोष पावतो. सारांश समाधान हें ज्याच्या त्याच्या मनावर आहे.

आतां तपश्चर्या आणि चोरी हीं दोन कर्में अगदी भिन्न प्रकारचीं व परस्पर विरुद्ध असतां, त्यांपासून समाधान आणि संतोष हीं कार्यें बहुत करून एका

प्रकारचीं व समानशील अशीं कशीं घडतात, हा प्रश्न सहज उत्पन्न होतो. याचें निराकरण इतकेंच कीं, एकादा छाकटा अमलानें गुंगला म्हणजे त्याला जसें वस्तूचें तथ्यस्वरूप समजत नाहीं आणि तेणेंकरून तो, खरोखर दुःखप्रद गोष्टीपासूनही कधीं कधीं परम हर्ष पावतो, त्याप्रमाणें अज्ञानांध मनुष्यास वास्तविक वाईट गोष्टीपासून परम अल्हाद होतो यांत विशेष चमत्कार नाहीं.

समाधान हें सुखाचें आदिस्थान आहे. मनुष्यमात्रास सुख अवश्य पाहिजे, असें मनांत आणून आमच्या परम दयाळु जगत्पित्यानें ह्या जगांत एकही गोष्ट त्यावांचून ठेविली नाहीं. मनुष्यावर महासंकटाचा प्रसंग गुदरला म्हणजे, तो पहिल्या धडाक्यासरसा फार गांगरून जातो; परंतु त्याच्या दुःखसागराच्या भरतीस किंचित् ओहोट लागला म्हणजे सूक्ष्मविचारानें कसें ना कसें तरी तो आपल्या चित्ताचें समाधान करून घेऊन, अल्पस्वल्प तरी मानसिक सुख भोगितो. ह्याच्या उदाहरणासाठीं फार दूर जाणें नको. थोडा विचार करा. आपल्या देखदेखत ज्याचा एकुलता एक पुत्र, जिवलग स्त्री, प्रिय बंधु इत्यादि आप्त मरण पावतात आणि त्या त्या प्रसंगीं त्याचें हृदय दुःखाग्नीनें अगदी होरपळून जातें व तेव्हांच्या स्थितीवरून जवळच्यांस असें वाटतें कीं, त्याला ते प्रसंग लवकरच राखेस मिळवितील; परंतु स्मशानांतला तो भयंकर संस्कार होऊन गेल्यावर त्याचे ठायीं जगदीशाच्या संकेतानुरूप समाधानरसाचे लहान लहान झरे

उद्भवूं लागतात. ते अल्पकालांतरानें वृद्धि पावून, जो त्हृदय दग्ध करणारा शोकाग्नि तो इतका नष्ट करून टाकितात कीं, तो उत्पन्न झाला होता कीं नव्हता याचा माग देखील राहूं देत नाहींत. मृत्यूसारख्या मोठ्या हानीच्या दुःखाचें देखील अशा रीतीनें समाधान होतें; मग इतर दुःखांची काय कथा ? "दगडापेक्षां ईट मऊ;" "तरी खैर झाली;" "सोनें असेल तर लाख मिळेल" इत्यादि उद्गार लोकांत हमेषा ऐकूं येतात, ते कशाकारितां बरें ? समाधनार्थ नव्हत काय ? यावरून समाधानप्रीति जनास किती आहे व त्याची व्याप्ति जगन्नियंत्यानें सर्व गोष्टींत कसकशी करून ठेविली आहे हें सहज लक्षांत येईल.

सदाचरणापासून साधूच्या मनावर जो परिणाम होतो तोच दुराचरणापासून दुष्टाच्या मनावर होतो असें वर सांगितलें; त्याविषयीं आणखी कांहीं बोलावयाचें आहे तें हेंच कीं, ते दोन परिणाम त्यांच्या भिन्न व्यक्तींस जरी एकसारखे वाटतात, तरी वस्तुतः ते अगदी भिन्न प्रकारचे आहेत. पाहा, साधूस झालेलें समाधान, त्याला इहलोकीं कीर्तिकर व सुखप्रद होऊन परलोकसुखप्राप्तीसही कारणीभूत होतें; आणखी त्यांत विशेष हें कीं, त्याच्या योगानें त्याला मृत्यूची भीति नाहींशी होते. कारण, आपण कुशाग्रन्यायी बापापुढें केव्हांही गेलों तरी आपल्या सदाचरणानुरूप आपणास सुखाचाच वांटा मिळेल अशी त्याची खातरी असते. मग तो मरणास काय म्हणून भिईल ? आतां दुष्टाची अवस्था लक्षांत आणा. त्याच्या

दुराचरणापासून त्याला ह्या लोकीं "सुख पाहतां जवा-पाडें, दुःख पर्वताएवढें" असें होतें. दुराचरणानें इहलो-कीं छीः थूः होतें; परलोकीं नरक भोगावा लागण्या-ची काळजी जन्मभर वाहावी लागते, आणि मरण येऊन टेकलें म्हणजे, परलोकाच्या मोठ्या दरबाराकडे तंद्री लागून कृतकर्माच्या परिणामाच्या भीतीनें तो अगदीं गांगरून जातो; आणि शेवटीं त्याला प्रखर यमयातना भोगाव्या लागतात, अशी त्याची दशा होते. यावरून सत्कर्माचें समाधान अवेळीपासून अखेरीपावेतों मनुष्याच्या सुखास कारण होतें, आणि दुष्कर्माचें समाधान कांहीं क्षण खेरीज करून सर्वदा दुःखप्रद होतें हें स्पष्ट आहे.

यास्तव विचारी पुरुषानें हर प्रयत्न करून सदाच-रणाच्या समाधानाचें सुख प्राप्त करून घेण्याचा ध्यास धरावा हेंच त्यास उचित आहे.

---

## इतिहासाचा अभ्यास.

मनुष्यें ह्या जगाच्या रहाटीमध्यें सहस्रशः कर्मे करितात, त्यांत त्यांस अनुभवाप्रमाणें दुसरें कांहींच उपयोगीं पडत नाहीं. त्या अनुभवामध्यें खुद्द त्यांचा अनुभव फारच थोडा असतो. कठीण व विकट अ-शा कामांचा उलगडा प्रायः त्यांस इतरांच्या अनुभवांवरू-न करावा लागतो, आणि तसें करणें हें बरोबर आहे; कारण आदीं मनुष्याचें आयुष्य अल्प, आणि त्यांत त्यास समजूं लागल्यावर त्यानें प्रथमतः सर्व गोष्टींचा स्वतः अनुभव घेऊन, मग त्या गोष्टी करावयास लाग-

णें हें अशक्यच आहे. सोमल खाल्ला तर काय होतें याची प्रचीत मनुष्यानें जातीनें पाहावी किंवा जनाच्या सांगण्यांत येईल ती खरी मानावी? याचें उत्तर अगदी अज्ञान मनुष्य देखील सहज देऊं शकेल, आणि त्यावरून आपल्या निर्वाहास इतरांचा अनुभव किती अवश्य आहे हें एकदम लक्षांत येईल.

इतिहास हें अनुभवशास्त्र आहे. यांतील सिद्धांत भूमितींतल्या सिद्धांतांप्रमाणें निरनिराळ्या प्रतिज्ञा लिहून जरी सोडवून दाखविलेले नसतात, तरी त्यांत मनुष्याच्या स्वाभाविक मनोधर्मांचें व त्यांच्या परिणामांचें कांहींशा पाल्हाळिक रीतीनें, पण बरोबर प्रतिपादन केलेलें असतें. तें ज्यास कळेल आणि त्याप्रमाणें जो वागेल तो इतर शास्त्रज्ञांपेक्षां अधिक सुखी होईल यांत संशय नाहीं. कारण मनुष्याचा स्वभाव ओळखण्याचे जितके प्रसंग मनुष्यास येतात तितके दुसरे कसलेच येत नाहींत आणि एका मनुष्यास खुद त्याच्या एकट्याच्या अनुभवावरून मानवस्वभावाचें जें ज्ञान होणार त्यापेक्षां सहस्रशः लोकांच्या स्वभावांचें, आचरणांचें व त्यांच्या परिणामांचें ज्यांत निदर्शन केलेलें असतें, अशा ऐतिहासिक ग्रंथांच्या अध्ययनानें त्याचें ज्ञान पुष्कळपट अधिक होईल.

मनुष्यांनीं अनेक प्रकारच्या विषयांवर जीं अनेक शास्त्रें लिहून ठेविलीं आहेत त्यांतील बहुतेकांस किंबहुना सर्वांस अनुभवावांचून दुसरा पाया नाहीं आणि ते अनुभव तरी एका मनुष्याचे नाहींत; अनेकांचे आहेत. ह्याचें खरेपण पाहणें असल्यास खगोल-

शास्त्र वाफेचें यंत्र इत्यादिकांचे इतिहास वाचावे, म्हणजे खात्री होईल. प्राचीनकाळीं ज्या ज्या मनुष्यास जो जो चमत्कारिक अनुभव आला तो तो त्या त्या मनुष्यानें मुखावाटे बोलून अथवा लिहून लोकांत प्रसिद्ध केला. असें होतां होतां पुढच्या मनुष्यांनीं मागच्या मनुष्यांचे अनुभव निर्विवाद सिद्ध आहेत असें मानून त्यांस आणखी आपले अनुभव जोडून शास्त्रें बनविलीं. यावरून तोंडच्या अथवा लेखी प्रसिद्ध प्राचीन व अर्वाचीन इतिहासांच्या आधारानेंच, सुखावह अशीं अनेक यंत्रें व विद्या निघाल्या आहेत हें लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं. हीं शास्त्रेंच काय, परंतु आपल्या परिपाठांतल्या बोलण्यांत ज्या शेंकडो म्हणी येतात त्याही अनुभवाच्या केवळ खाणीच आहेत. त्या आपणास फार गोड लागतात, त्याप्रमाणें इतिहासही लागावा, आणि तो तसा लागतो; पण त्याचें अध्ययन मात्र फार विचारानें केलें पाहिजे.

आणखी वैद्यशास्त्राचेंही उदाहरण घ्या. मनुष्यांनीं नानाप्रकारच्या रोगांवर नानाप्रकारच्या पदार्थांचीं औषधें ठरवून ठेविलीं आहेत, आणि त्यांचा गुणही येतो. तेव्हां इतक्या सहस्रावधि पदार्थांच्या गुणाचा परिचय एकासच घेतां आला असेल काय? नाहीं. तर तें शास्त्र अनेकांच्या अनुभवांनीं सिद्ध झालें आहे व त्यास दिवसेंदिवस आलीकडच्या मनुष्यांच्या अनुभवाची भर पडून तें पूर्णतेस येत चाललें आहे. आणि तेणेंकरून जगाचें मोठें हित होत आहे. यावरून अनुभवाचा उपयोग व त्याचें केवळ भांडार असा जो

इतिहास त्याची योग्यताही लक्ष्यांत येईल. जगाच्या सुखाच्या वृद्धीस इतर गोष्टींपेक्षां अनुभव अधिक कारणीभूत होतात अशी ज्यांची खातरी होऊन गेली होती त्या बेकन इत्यादि महाविद्वानांनीं आपणांस समजलेली कोणतीही अपूर्ण प्रतीति आपणांजवळ गुप्त ठेविली नाहीं. वर सांगितलेल्या विद्वानानें आपल्या मरणापूर्वीं थोडे दिवस बर्फांत ठेविलेलें प्राण्याचें प्रेत सडतें किंवा नाहीं हें पाहण्यासाठीं एक पांखरूं मारून बर्फांत घालून ठेविलें होतें; तें मरणाच्या अगोदर एक दोन दिवस काढून पाहिलें तों, जशाचें तसेंच सबंद सांपडलें. ही गोष्ट लिहिण्याजोगें त्याच्या अंगीं सामर्थ्य नसतांही, ती त्यानें मोठ्या कष्टानें लिहून ठेविली, कीं ती लोकांस समजावी. अशा उपयुक्त शास्त्रीय गोष्टी व मनुष्यास कोणत्या प्रसंगीं कोणती स्थिति प्राप्त झाली असतां तो कोणाशीं कसा वागतो इत्यादि नित्य पाठांतल्या गोष्टी विचारपूर्वक ग्रंथावलोकनानें व इतिहासाच्या वाचनानें कळतात. तेव्हां इतिहास हें एक ज्ञानभांडारच आहे, हें कोणी नाकबूल करणार नाहीं.

---

## प्रिन्स आल्बर्त.

मनुष्य दरिद्रावस्थेंत असतो तेव्हां ज्ञान, परोपकार, सदाचरण इत्यादि गोष्टींच्या योगानें लोकप्रीति संपादून चालतो यांत कांहीं नवल नाहीं. कारण लोकांमध्यें सुखानें संसार करण्यास त्यावांचून दुसरा उपायच नाहीं. परंतु संतति, संपत्ति, विद्या, महत्त्व इत्यादि मादक गोष्टींच्या ऐन भरांत असतांही जे ज्ञान,

परोपकार व सदाचरण यांस विसरत नाहींत तेच सत्पुरुष होत. अशा प्रकारच्या पुरुषांचीं चरित्रें मनास रंजवितात व सुबोध करितात, म्हणून आपल्या महाराणी साहेबांचे भ्रतार प्रिन्स आल्बर्त ह्यांचें चरित्र थोडक्यांत लिहितों.

हे साक्स कोबर्ग संस्थानाच्या राजवंशामध्यें इ० स. १८१९ या वर्षी जन्मले. त्यांचा विद्याभ्यास त्यांच्या तीर्थरूपांच्या सक्त नजरेखालीं अल्पवयांतच फार चांगला झाला. न्यायशास्त्र आणि इतिहास हे त्यांच्या अभ्यासाचे मुख्य आवडते विषय होते. शिवाय फावल्या वेळांत ते नाना तऱ्हांचीं चित्रें वगैरे काढून आनंदानें कालक्रमण करीत असत. त्यांच्या लहानपणांत त्यांनीं काढिलेली एक उत्कृष्ट तसबीर हल्लीं आमच्या महाराणी साहेबांच्या आरसेमहालांत टांगलेली आहे.

इ० स० १८३८ त प्रिन्स आल्बर्त हे महाराणी साहेबांच्या राज्याभिषेकसमारंभाकरितां आपल्या तीर्थरूपांबरोबर इंग्लंदास गेले, आणि लंदन व विंदसर येथें इतर जमलेल्या राजेरजवाड्यांपेक्षां अधिक दिवस राहिले. नंतर स्वदेशीं गेले. ते १८३९ त पुनः इंग्लंदास गेले. तेथें राणीसाहेबांच्या बरेच दिवस मुलाखाती चालल्या. नंतर त्यांशीं आपला विवाह करण्याविषयीं आपला अभिप्राय राणीसाहेबांनीं पार्लमेंत सभेस कळविला व तिनें तो मान्य केला आणि पुढें लागलाच विवाह झाला. मग त्यांचें ऐश्वर्य काय पुसायाचें आहे ! सर्व सुखावह गोष्टी जणुं काय हात

जोडून त्यांजपुढें उभ्याच होत्या. कशाचीही वाण नव्हती. तरी अशा भरभराटीमध्यें त्यांच्या हातून एक-ही गैर गोष्ट घडली नाहीं. फक्त लोकहिताकरितां मात्र ते राजकारभारांत कधीं कधीं मन घालीत असत. बाकी बहुतेक वेळ ग्रंथावलोकन, स्वकुटुंबाचें लालन, पालन आणि दीनाचें दुःखनिवारण ह्यांकडे ते लावीत असत. शेतकीच्या कामाच्या सुधारणेकडे त्यांचें लक्ष फार होतें व ते तिच्या बढतीसाठीं बक्षिसें वगैरे देऊन पुष्कळ उत्तेजन देत असत. मजूर लोकांची विपत्ति दूर करण्यासाठींही त्यांनीं बहुत यत्न केले व त्या विषयावर इ० स० १८४८ त एक मोठें व्याख्यान दिलें. रयतेंत दुफळी, भांडणें आणि बंडें हीं मनुष्याच्या दुःखास बहुतांशीं कारणीभूत होतात असें त्यांच्या मनांत पक्कें वागलें होतें; म्हणून सर्व मनुष्यांनीं एकमेकाशीं सलोख्यानें राहणें हें सुखाचें मूळसाधन आहे असें ते लोकांस वारंवार सांगत असत. त्यांनीं नीति, धर्म, लोकस्थिति इत्यादि विषयांवर अनेक वेळ सुरस संभाषणें केलीं तीं छापून प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांच्या योगानें लोकांची दाद लागली व त्यांच्या अनेक सोयी झाल्या. त्याप्रमाणें त्या पुरुषाच्या एकनिष्ठ मध्यस्थीनें आपणास आणखी सुखें प्राप्त होतील आणि आपण त्यांचें चिरकाल कल्याण चिंतूं अशी इच्छा आबालवृद्ध करीत होते. इतक्यांत राणीसाहेबांचे प्रियभर्ते व मनःपूर्वक लोकहितकर्ते प्रिन्स आल्बर्त यांजवर ता० १४ दिसेंबर १८६१ रोजीं एकाएकी मृत्यूची उडी पडली, आणि

त्यांचा इहलोक समाप्त झाला. तेव्हां राणीसाहेबांस व त्यांच्या प्रजेस फार दुःख झालें. प्रिन्स आल्बर्त हे निर्व्यसनी, सदाचरणी आणि दीनदयाळ असे होते.

आतां थोडा विचार करा. प्रिन्स आल्बर्त यांस सुखोपभोगाच्या कोणत्याही गोष्टीची कमताई नव्हती व इतर कोणत्याही रीतीनें आपलें आयुष्य घालविण्यास त्यांस प्रतिबंध नव्हता, तरी ज्ञानसंपादन, सदाचरण, स्वकुटुंबाचें लालनपालन आणि लोकहित यांखेरीज इतर कोणत्याही कामीं त्यांनीं आपला वेळ खर्चिला नाहीं. यावरून इतकाच बोध घ्यावयाचा कीं, मनुष्य कोणत्याही स्थितींत असो, त्यानें प्रिन्स आल्बर्त यांजप्रमाणें स्वशक्त्यनुसार आपल्या आयुष्याचा व्यय करावा हें योग्य आहे.

---

## आयुष्य.

ईश्वरानें मोठी कृपा करून आयुष्य ही एक उत्कृष्ट देणगी आपणांस दिली आहे, ती आपणाकडे राखणें अथवा आपणापासून काढून नेणें हें सर्व त्याच्या हातीं आहे. या लोकीं आपणास जीं जीं कामें करावयाचीं आहेत त्यांस इतर सर्व साहित्यांपेक्षां आयुष्य अधिक अवश्य आहे; आणि त्याचा एक विशेष गुण असा आहे कीं, तें एकदा संपलें ह्मणजे कांहीं केल्यानें पुनः प्राप्त व्हावयाचें नाहीं. यास्तव एवढ्या महत्त्वाचें जें आपलें आयुष्य त्याविषयीं आपणास वारंवार विचार करणें प्राप्त आहे.

"मनुष्याचा जीव क्षणभंगुर आहे", असें प्रायः स-

र्व लोक हमेषा बोलत असतात; परंतु त्याचा अर्थ ज्यांच्या मनांत पक्का बिंबला आहे अशीं माणसें आढळ-णें फार कठीण आहे. “नळी फुंकिली सोनारें, इक-डुन तिकडे जातें वारें”, या म्हणीप्रमाणें माणसाची अवस्था आहे. जे आणे आपले वाडवडील म्हणत आले ते आपणही म्हणावे आणि प्रसंग पडेल त्याप्र-माणें आपलें ज्ञान व बहुश्रुतपणा हीं लोकांस दाखवा-वीं हाच काय तो त्यांचा हेतु असतो, ही मोठी दुः-खाची गोष्ट होय. मनुष्य तोंडानें कितीही बोलो; परंतु आपलें आयुष्य लवकर संपेल असें को-णासही वाटत नसतें. कलीमध्यें मनुष्याची आयुष्य-मर्यादा १०० वर्षांची आहे हें सर्व लोक कबूल करि-तात, तरी ९९॥ वर्षांचा मनुष्य पुढील वर्षांची तजवी-ज करून ठेवीत असतो अथवा नाडीची धरसोड चा-ललेला मनुष्य आपल्या बरेपणाचे उपाय शोधीत अस-तो. यावरून आपल्या आयुष्याची आस्था मनुष्यास किती आहे हें सहज ध्यानांत येईल.

जोंपर्यंत एकादी वस्तु मनुष्यापाशीं विपुल असते तोंपर्यंत तिचें तथ्य महत्त्व त्याच्या ध्यानांत येत नाहीं; परंतु जसजशी तिची त्याला कमताई पडूं लागते तस-तशी तिची योग्यता व किंमत त्यास अधिकाधिक सम-जत जाते. हा नियम आयुष्यास लागू आहे. कालचा दिवस जाऊन त्याच्या मागोमाग मध्यें खंड न पडतां आजचा येतो आणि असाच क्रम आयुष्याच्या शेवट-च्या दिवसापर्यंत चालतो, ह्मणून मनुष्यास आयुष्य दुर्मिळ आहे असें वाटत नाहीं व त्याचें खरें महत्त्व

शेवटचा क्षण आल्यावांचून त्यास समजत नाहीं. आणि तेणेंकरून आयुष्याच्या महागाईचें स्मरण न होऊन मनुष्याचीं वर्षांनुवर्षें आळसांत व ऐषआरामांत जातात; याचा सुज्ञजनांनीं विचार करावा, आणि आपली एक घटकाही व्यर्थ जाऊं न देतां नेहमी उद्योग करावा.

आपल्या आयुष्याचा कांहीं अंश गेला आहे, कांहीं जात आहे आणि कांहीं जावयाचा आहे. जो गेला तो गेलाच; त्याजवर आतां आपली सत्ता राहिली नाहीं. जो जावयाचा आहे त्याविषयीं कांहींच नेम सांगवत नाहीं; परंतु जो हल्लीं जात आहे तो मात्र आपला खरा. आतां हा आपला म्हटलेला काल आपल्या सगळ्या आयुष्याच्या मानानें पाहिला असतां किती थोडा आहे हें लिहून कळविण्यापेक्षां ज्याचें त्यासच सूक्ष्म विचारांतीं सहज समजेल. ह्या अल्प कालाच्या उपयोगांत गत आयुष्यांतील अनुभव आणि पुढील आयुष्याची तजवीज हीं फार लक्ष्यांत टेविलीं पाहिजेत. मागें आपण कोणकोणते बेत केले होते, त्यांतले फसले किती व ते फसण्यास कारणें काय झालीं आणि जे साधले त्यांस साधनें कोणकोणतीं कशीं करावीं लागलीं व त्यांचा परिणाम काय झाला इत्यादि गोष्टींची आठवण करून मग कोणत्याही कामास हात घालावा. तरच हित होईल.

आपली स्वहितेच्छा आपणास नानाप्रकारचे उत्कृष्ट बेत वारंवार सुचवीत असते; परंतु आपलें आयुष्य लवकर संपावयाचें नाहीं, अशा आपल्या संवयींत

पडून गेलेल्या दुष्ट मताच्या योगानें आपण तें आज करूं, उद्यां करूं अशा हेळसांडीवर टाकितों आणि प्रसंग पडून हाल होऊं लागल्यावर आपले डोळे उघडतात व मोठा पश्चात्ताप होतो; त्याचें दुःख परम दुःसह आहे हें सर्वांच्या अनुभवास येऊन चुकलेंच असेल. आपलें हित करून घेण्याचे उपाय सुचतेच ना, तर गोष्ट निराळी; परंतु ते कळून वळूनही आपण आपल्या आळसामुळें केले नाहींत आणि परिणामीं अशा दुःखास पात्र झालों त्याअर्थी आपलें प्रारब्धच खोटें असें ह्मणून मनुष्यें फार दुःख करीत बसतात. तर मित्र हो, हा दुःखाचा पर्वत मनुष्यांवर कोण पाडितो समजलें? आळस; दुसरा कोणीं नाहीं. यास्तव विचार करा. आपलें आयुष्य कधींही व्यर्थ जाऊं देऊं नका. जें काम आज होण्याजोगें असेल तें उद्यांवर टाकूं नका. चांगल्या कामाच्या बेताखालींच दिवसांचे दिवस खर्चूं नका. आपल्याकडून होईल तितकी तयारी करून व आपलें सामर्थ्य पाहून चांगल्या कामास एकदम आरंभ करावा आणि होईल तितक्या तजविजीनें तें सिद्धीस न्यावें. कोणत्या एकाद्या गोष्टीच्या कमतरतेमुळें तें कच्चें अथवा अपूर्ण राहिलें तरी त्याचा शीण मानूं नये. कारण कोणत्याही सत्कृत्याचा मनामध्यें नुसता हेतुच असणें त्यापेक्षां तें कच्चें किंवा अपूर्ण असें तयार करणें बरें. कां कीं, कच्चें किंवा अपूर्ण काम केव्हां ना केव्हां तरी थोड्या बहुत श्रमांनीं पक्कें अथवा पूर्ण करतां येईल; परंतु मुळींच तयार नसलें म्हणजे तें कच्चें अथवा

अपूर्ण तयार करण्याचे आणि नीट करण्याचे ह्या दोहोंचेही श्रम आपल्या हातून होण्याचे राहतात आणि वेताखालींच आयुष्य निघून जातें. शेवटीं संकटाचा अथवा मृत्यूचा प्रसंग येऊन धडकला म्हणजे आपले डोळे उघडतात; परंतु उपयोग काय? "बैल गेला आणि झोंपा केला," अशी अवस्था होते. म्हणूनः

काहीं धांवाधांव करीं। जोंवरी आहे मृत्यु दुरी॥ १॥

तुकाराम.

---

## औरंगजेबाच्या स्वभावाचें वर्णन.

हिंदुस्थानामध्यें पूर्वी जे मोंगल बादशाह महापराक्रमी होऊन गेले, त्यांतील उत्तमांत या पुरुषाची गणना आहे. या पुरुषाच्या हातून मोटमोठ्या घडामोडी झालेल्या आपण इतिहासांत वाचितों, तेव्हां त्याचा स्वभाव फार विलक्षण असेल असें सहजच मनांत येतें व तो जाणण्याची इच्छाही उत्पन्न होते. म्हणून त्याची हकीकत थोडीशी प्रथमतः लिहून मग त्याच्या स्वभावाचें वर्णन करूं.

औरंगजेब हा शहाजहान बादशहाचा तिसरा मुलगा होता. तो लहानपणीं साधाभोळा आणि विरक्त असा सर्वांस दिसत असे; परंतु तें सगळें ढोंग होतें असें त्याच्या कृतीवरून पुढें लवकरच दिसून आलें. त्यानें आपल्या बापास पदच्युत करून व दोन भाऊ आणि एक पुतण्या यांस ठार मारून राज्यपद मिळविलें. गोंवळकोंडें, बंगाल, विजापुर आणि कर्नाटक हीं काबीज केलीं, आणि कांहीं वर्षेपर्यंत अशा उत्कृष्ट

रीतीनें राज्य चालविलें कीं, एशिया व युरोप या दोन्ही खंडांत त्याची मोठी कीर्ति झाली. परंतु पुढें त्याच्या मुलांनीं त्यास पदच्युत करण्यासाटीं जीं बंडें केलीं त्यांच्या योगानें राज्यांत बेबंदी होऊन गेली. तो इ० स० १७७० त, अहमदनगर येथें, ८९ वर्षांचा होऊन मृत्यु पावला. तेव्हांपासून मोंगलांच्या राज्यास उतरती कळा लागली. नंतर पुढें थोडक्याच वर्षांनीं तें भयाभंगास गेलें.

आतां या बादशहाच्या स्वभावाविषयीं एलफिन्स्तनकृत हिंदुस्थानाच्या इतिहासामध्यें फार चमत्कारिक व मनोरंजक वर्णन लिहिलें आहे, तेंच येथें उतरून घेऊन हा निबंध समाप्त करितों.

"औरंगजेबाचें शूरत्व, शहाणपण आणि हुशारी, हीं पाहून त्याच्या कारकीर्दींत त्यास जय कसा मिळाला नाहीं याविषयीं एक एतद्देशीय इतिहासकार अचंब्यांत पडला आहे; परंतु त्या बादशाहामध्यें जें वास्तविक व्यंग होतें तें त्याच्या अंतःकरणांतच होतें. जर यामध्यें उदार व मोकळ्या मनाची बुद्धि असती तर हा बादशहा मोठ्या योग्यतेस चढला असता आणि याच्या धर्मसंबंधी कोत्या बुद्धीनें याच्या रयतेचें मन यावरून उठलें नसतें; तसेंच याच्या सर्वकाळ संशयखोर व बेभरंवशाच्या स्वभावामुळें याच्या सरदारांचे हात पाय मोडून त्यांचा उत्साह थंडा पडला नसता. धर्मसंबंधी जे याचे अगदी अल्प समज होते त्यांविषयींचें आतां शेवटचें बोलणें बोलतों. या हलक्या विचारांनीं याच्या राज्याचा पुष्कळ नाश

झाला; त्याविषयीं विचार करून पाहतां जो वाईट परिणाम झाला तो होण्यास प्रत्यक्ष जुलूम थोडाच झाला होता हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. याच्या क्रूरतेच्या किंवा जुलुमाच्या कृत्यांनीं हिंदुलोक संतापले असें नाहीं; परंतु एकसारखी त्यांवर शिस्त बसवून त्यांच्यांत नाउमेदी उत्पन्न केल्यामुळें ते चिडून गेले. औरंगजेबानें त्यांस सरकारी कामांतून काढून टाकिलें; त्यांजवर मुद्दाम कर बसवून त्यांची अप्रतिष्ठा केली; त्यांच्या यात्रा व सणांचे समारंभ बंद केले; त्यांच्या देवस्थानांचे केव्हां केव्हां विटंब करून केव्हां केव्हां नाशही केला, आणि दरबारसंबंधी आगतस्वागताच्या व्यवहारानें किंवा इतर वहिवाटींनीं त्यांच्या देवभोळेपणास उत्तेजन पोहोंचतें असें दिसण्यापुरतें निमित्त सांपडलें कीं, ते व्यवहार व त्या वहिवाटी बंद करण्यास त्यानें कमी केलें नाहीं; यद्यपि धर्माच्या सबबेनें त्यानें कोणा हिंदूचा प्राण घेतला, अथवा त्यास कैदेंत टाकिलें अथवा त्याची जिनगी हिरावून घेतली असें झालें नाहीं; अथवा कोणीही आपल्या पूर्वजांप्रमाणें प्रसिद्धपणें कोणताही धर्म आचरीत असल्यावरून त्यास कोणी विचारिलें असेंही झाल्याचें दिसत नाहीं तथापि धर्माच्या बाबतींत मध्यें परस्परें संशय व वैरभाव असल्यामुळें जसा परिणाम होत असतो तसा औरंगजेबाच्या पक्षपाती व दुराग्रही स्वभावामुळें झाला आणि लोकांत जशी हट्टाग्रहाची विरोधवृत्ति उत्पन्न झाली तशी अतिशय जुलमाच्या कृत्यांपासूनही फार थोडाच वेळ होत असते. ”

"औरंगजेबाचीं पांच सातशें पत्रें बाळगून ठेविलेलीं आहेत त्यांवरून त्याच्या स्वभावाविषयीं आपणास थोडें थोडें ज्ञान होतें. शिवाय त्याच्या कृत्यांनीं त्याच्या स्वभावांतील मुख्य मुख्य गोष्टी नजरेस पडतात. त्याचा धर्मसंबंधी इतका दुराग्रह होता तरी तो देव-भोळा नव्हता. त्यास मनापासून हिंदूंचा त्रास असे आणि शिया लोकांवरही त्यांहून विशेष भक्ति नसे आणि मशीदी अथवा इतर धर्मादाय यांत त्यानें आपला पैका खर्चिला नाहीं. तो मुल्ले लोकांच्या कबजाखालीं होता असें दिसत नाहीं आणि फकीर व दरवेशी यांच्या ओढून ताणून आणलेल्या पवित्रतेस तो वारंवार तुच्छ करीत असे.

"त्याच्या राज्यामध्यें जिकडे तिकडे सतत बेभरं-वशाची शिस्त असे. प्रत्येक मनुष्याच्या चाली-विषयीं तो गुप्तपणें शोध ठेवीत असे आणि एकमे-काचा परस्पर दाब बसावा असे साधी तो निवडून काढीत असे. इतकेंही असून औरंगजेबासारखें कोणच्याच राजास लोकांनीं अधिक ठकाविलें नाहीं आणि कोणाचीही इतकी वाईट चाकरी केली नाहीं."

"जेव्हां जेव्हां त्याचे अति जुने आणि फार लग्या-चे मित्र मरण पावले हें वर्तमान त्यास लागे तेव्हां तेव्हां तो जी वर्तणूक करी तिजवरून त्याचें अंतःकरण निर्दय असे हें उघड होतें. हा पुष्कळ वर्षेंपर्यंत वांचला होता तितक्या मुदतींत असे प्रसंग वारंवार आले; त्यावेळीं त्यानें कांहीं धर्मसंबंधी गोष्टी अथवा तत्व-विचार पुढें आणून, मागून मयताची जिनगी ताब्यांत

द्यावी; कोणीही अफरातफर न करी असा बंदोबस्त करावा; त्याच्या ठेवी उकरून काढाव्या, आणि त्याचें लोकांकडील कर्ज तजविजीनें वसूल करावें असा तो सक्त हुकूम देत असे."

"त्याच्या पत्रांत बहुधा कांहीं काव्यांतील वेंचे अथवा कुराणांतील वाक्यें नाहींत अशीं नाहींतच. त्याचीं पत्रें केव्हां केव्हां सलगीचीं असून केव्हां केव्हां त्यांत थट्टाही आहे, त्यांतूनही जीं पत्रें त्याच्या मुलांस गेलेलीं आहेत त्यांत विशेषेकरून आहे."

"त्याच ग्रंथामध्यें औरंगजेबानें आपल्या मृत्युसमयीं जीं पत्रें आपल्या मुलांस लिहून पाठविलीं त्यांतील कांहीं वाक्यें घेतलीं आहेत, तीं अशीं:—

"काय होणें असेल तें होऊ. मी माझें जहाज समुद्रांत लोटलें आहे. × × × ईश्वर तुझें कल्याण करो, ईश्वर तुझें कल्याण करो, ईश्वर तुझें कल्याण करो."

हीं वाक्यें शहाजादा अजीम याच्या पत्रांतलीं आहेत. त्यांतून धाकटा मुलगा कंबक्ष याच्या पत्रांत फार जिव्हाळ्याचीं भाषणें आहेत; त्यांतील कांहीं येणें प्रमाणें:—

"आपले उमराव कितीही लबाड असले तरी त्यांशीं निष्ठुरतेनें वर्तणूक करूं नये. नम्रतेनें व कपटानें आपले हेतु सिद्धीस नेणें हें आवश्यक आहे."

या उपदेशाशिवाय त्यानें त्या पत्रांमध्यें आपल्या दुःखाच्या स्थितीविषयीं उद्गार घातले आहेत, ते असे:—

"मी जिकडे पाहतों तिकडे मला ईश्वराशिवाय कांहींच दिसत नाहीं. मी पुष्कळ अपराध केले आहेत त्यांबद्दल मला शासन काय होईल तें समजत

नाहीं. मृत्यूचे क्लेश मला फार जोरानें गांजीत आहेत. मी आतां निघालों आहें. जें मीं बरें किंवा वाईट केलें तें तुझ्याकरितां केलें."

यावरून औरंगजेबाचा स्वभाव व त्याचें मरणकाळचें दुःख हीं लक्षांत येतील. तो आपल्या पुत्रास कपट करण्याचा उपदेश करितो, यावरून तो स्वतः किती छद्मी होता हें स्पष्ट होतें. असो; अशा कपटानें मिळविलेलें सुख त्याच्या उत्तरवयांत कमी कमी होत चाललें. त्याची त्यास लाज वाटूं लागली आणि मरतेसमयीं कृतकर्माचा पश्चात्ताप होऊन त्यास इतक्या दुःसह वेदना सोसाव्या लागल्या हें त्याच्या पूर्वाचरणाचें फळ त्याला परमेश्वरानें ह्याच जन्मीं रोख दिलें असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. यासाठीं मनुष्यानें पावलोपावलीं विचार करावा. औरंगजेबासारखा बादशहा देखील दुराचरणानें दुःखसागरांत बुडाला, तर मग आपली काय कथा? म्हणून मित्रहो, कोणतेंही काम अन्यायानें करूं नका. नीतीनें करा, म्हणजे तुम्हांस सर्व आयुष्यभर सुखांत राहावयास सांपडेल.

---

## सुभाषित वेंचे.

१. एल्समेर साहेब एका मोठ्या सरकारी कामावर होता. त्याजकडे एका मनुष्यानें एक अर्जी आणिली. ती बरोबर नव्हती म्हणून वाचल्याबरोबर साहेबास फार राग आला, आणि तो त्यास म्हणाला "कायरे बाबा, तुला काय पाहिजे?" त्यानें उत्तर केलें

" महाराज, या अर्जाच्या कामांत आपला हात असावा एवढेंच मागणें आहे." मग साहेब बोलला "घे, बाबा, हात एकच कां मागतोस; हे दोन्ही घे" असें म्हणून त्यानें ती अर्जी दोन्ही हातांनीं टराटर फाडून टाकिली.

२. जेम्स राजा आपल्या देशांत स्वारीस बाहेर जाई; तेव्हां तालुक्यांतील बडेलोकांस विनोदानें ह्मणें कीं, " लंडन शहरीं, तुम्ही, अफाट समुद्रांतील लहान- शा होडक्यांप्रमाणें दिसतां; परंतु येथें, लहान नदींती- ल मोठ्या जहाजां प्रमाणें वाटतां."

३. डायोजिनिसाला एकानें विचारलें " महाराज, श्रीमान लोकांकडे पंडित लोक जातांना हमेशा आढळ- तात. परंतु पंडितांकडे श्रीमंत लोक कधीं जात नाहींत, याचें कारण काय? त्यानें उत्तर दिलें, " बाबा, आपणा- स काय काय पाहिजे हें विद्वानास समजतें, आणि श्रीमंतांस समजत नाहीं, हेंच त्याचें कारण".

४. कांहीं कामकाज मिळावें ह्मणून सर एडवर्ड या नावाचा एक इटालियन मनुष्य, इलिझाबेथ राणीजवळ, तिच्या वचनावर पुष्कळ दिवस वाट पाहात राहिला होता. एके दिवशीं ती आ- पल्या बागांत फिरत असतां त्या गृहस्थास म्हणाली, " जेव्हां माणसाचें मन रिकामें असतें, तेव्हां तो कशा- चा विचार करीत असतो बरें?" तो म्हणाला, "स्त्रियां- च्या वचनाचा" हें ऐकून तिला फार राग आला; आणि ती त्यास बोलली, "अहो एडवर्ड साहेब, मी तुमचें खंडन करीत नाहीं. परंतु, इतकें खरें

कीं, मंद बुद्धी मनुष्यांस देखील रागाच्या झपाट्यांत मर्मभेदक भाषणें सुचतात; परंतु त्याच्या योगानें ते सदा दरिद्रीच राहतात."

५. मासिदोन देशाचा राजा दिमित्रियस, आपल्याकडे नेमिलेल्या राज्यकारभाराचें काम सोडून, मी आजारी आहें, अशी खोटी बातमी उठवून व त्याप्रमाणें आपल्या बापास निरोप पाठवून आपल्या रंगमहालामध्यें स्वस्थ मौजा करीत बसला होता. इतक्यांत त्याचा बाप आंटिगोनस हा एकाएकीं तेथें आला. तेव्हां दिमित्रियस थोडासा चपापून घाबऱ्या घाबऱ्या म्हणाला, "बाबा बाबा माझा ताप आतां इतक्यांत निघाला बरें." आंटिगोनस बोलला, "हो, खरें रे खरें; आतां या दरवाज्यांत मला भेटला तो तोच वाटतें."

६. एक ग्रीक विद्वान् म्हणतो, "कायदा हें एक जाळें आहे. जो भोळवट असतो, तो त्यांत सांपडतो; परंतु जो पटाईत असतो तो त्यांतून तेव्हांच निघून जातो."

७. एक मनुष्य कसबिणीच्या घरांतून निघतांना पाहिल्यावरून, प्लेटोनें त्याचा फार निषेध केला. तो मनुष्य म्हणाला, "एवढ्याशा यःकश्चित गोष्टीचा तुम्ही इतका तिटकारा कां करितां." प्लेटो बोलला, "संवय ही कांहीं लहान गोष्ट नव्हे."

८. शिकंदर बादशहा एशिया खंडांत आला तेव्हां, तो आपल्या जवळच्या सरदार, शिपाई, विद्वान्, इत्यादि गुणी मनुष्यांस फार बक्षिसें वांटीत सुटला.

तेव्हां परमिनियो यानें त्यास पुसलें, "महाराज आपण आपल्या साठीं काय राखून ठेवितां", बादशहानें उत्तर दिलें "सर्व मनुष्यांची कृपा."

९. डायोजिनिसाला एकानें विचारलें, "ज्ञान कशास पाहिजे?" त्यानें सांगितलें, "अज्ञान घालवावयास".

१०. एक वृद्ध स्त्री सिसरोच्या पंक्तीस भोजनास बसली असतां, "मला अवघीं चाळीस वर्षें आहेत" असें बोलली. तेथें दुसरा कोणी गृहस्थ होता त्यानें सिसरोच्या कानांत सांगितलें कीं, हिचें वय ४० हून पुष्कळ जास्त आहे यांत संशय नाहीं. सिसरो त्यास म्हणाला, "अरे, मी तिचें म्हणणें कधींही असत्य मानणार नाहीं; कारण 'मी चाळीस वर्षांची आहें' असें तिचें भाषण मी दहाबारा वर्षांपूर्वीं बहुत वेळ ऐकिलें आहे."

११. मासिदोनचें संस्थान दुर्बल असतां डायोजिनिसाच्या देखदेखत मोठ्या भरभराटीस आलें. तो मरावयास टेंकल्यावर त्यास एकानें असा प्रश्न केला कीं, "तुम्हांस कोणत्या रीतीनें पुरावें?" डायोजिनिस म्हणाला, "खालीं तोंड करून पुरा; कारण कीं, कालेंकरून ही सृष्टि अगदीं उलटी होईल तेव्हां मी सहजच नीट होईन."

१२. स्पेन देशाची इलिझाबेथ राणी म्हणत असे कीं, "ज्यां जवळ समयसूचकता आणि सज्जनपण, हीं आहेत त्यांचीं तीं सर्वदां शिफारसपत्रेंच आहेत असें समजावें."

१३. कोणी मनुष्य कांहीं दिवस चिताऱ्याचें काम

करून मग वैद्य झाला. तेव्हां त्यास एकानें म्हटलें "तुम्हीं वैद्य झालां हें चांगलें केलें; कारण पूर्वींच्या धंद्यांतल्या तुमच्या चुक्या दृग्गोचर होत; परंतु आतांच्या धंद्यांतल्या बिलकूल दिसावयाच्या नाहींत."

१४. भक्ति किंवा प्रीति निष्काम असली तरच ती चिरकाल राहील.

१५. आगस्तस बादशहाच्या कारकीर्दींत हुबेहुब त्याच्या सारखा एक मनुष्य रोमशहरांत आला. त्याला बादशहानें समोर आणून पुसलें, "अरे, तुझी आई पूर्वी कधीं या शहरांत आली होती काय?" यावर त्या मनुष्यानें खुबीदार असें उत्तर दिलें कीं, "महाराज, माझी आई नव्हती आली; पण बाप आला होता खरा.

ह्या जबाबाच्या अर्थासाठीं जरा खोल विचार केला पाहिजे.

---

## इब्राहीम आणि अबदल्ला.

अल्नारस्किन नामक मोठा संशयी, जुलमी, आणि क्रूर बादशहा बऱ्याच वर्षांमागें प्रशिया देशांत होऊन गेला. त्यानें आपल्या पस्तीस राण्या आणि वीस पुत्र यांजवर आपला प्राण घेण्याच्या कटाचा दोषारोप करून ठार मारिलें. शेवटीं स्ववंशक्षयकर्माचा त्यास पश्चात्ताप होऊन त्यानें आपल्या हेलीम नामक विद्वान राजवैद्यास बोलावून आणिलें, आणि सांगितलें कीं, "आजपावेतों जें झालें तें झालें; आतां आमचा वृद्धापकाल आला; आमच्या पश्चात् हें राज्य हाकण्यास कोणी शहाणा पुरुष गादीवर बसावा असें आमच्या मनांत आहे;

म्हणून हे आमचे दोन पुत्र विद्या व राजनीति ह्यांच्या अध्ययनार्थ आम्हीं तुमच्या पदरीं घातले आहेत; यांस आपल्या पुत्रांप्रमाणें मनापासून पढवावें; आणि आम्हीं उभे आहों तोंपर्यंत आमचा उपमर्द न करितां आमच्या मागें राज्यकारभार उत्तम प्रकारें करीत असें त्यांस तर्बेज करावें." वैद्य बोलला, "राजाज्ञा मला शिरसा वंद्य आहे; महाराजांचे आज्ञेप्रमाणें मी राजपुत्रांस तयार करितों."

इतकें ठरल्यावर त्या वैद्यानें त्या दोन्ही राजपुत्रांस आपल्या घरीं नेलें, आणि नीतिशास्त्राचा वगैरे त्यांजकडून फार चांगला अभ्यास करविला. थोरल्या मुलाचें नांव इब्राहीम, व धाकट्याचें अबदल्ला असें होतें. ते एकमेकांवर पराकाष्ठेची प्रीति करीत असत. त्यांच्या गुरूस म्हणजे हेलिमास, बलसोरा म्हणून एकुलती एक मुलगी होती. ती आपल्या बापाची मोठी लाडकी असे, व त्यानें तिला त्या राजपुत्राप्रमाणेंच विद्येंत निपुण केलें होतें. ती रूपानें अति सुंदर, स्वभावानें गरीब, आणि वयानें आपल्या सारखीच तरुण आहे असें पाहून नेहेमींच्या संघट्टनानें अबदल्ला याचें मन तिजवर इतकें जडलें कीं, तिजपासून अंमळ दूर जाणें म्हटलें म्हणजे त्याला केवळ मृत्युसमान वाटूं लागलें. ही इतकी गुणवती आहे हें बादशहाच्या कानीं गेलें. तें ऐकतांच तो उतावळा पुरुष तिला पाहण्याविषयीं फार उत्सुक झाला, आणि लागलेंच त्यानें हेलिमास बोलावणें पाठविलें. तो येतांच त्याला बादशहानें विचारिलें कीं, "वैद्यराज, तुम्ही आजपावेतों सरकारची

चाकरी इमानें इतबारें केली, तिजबद्दल तुम्हांस कांहीं बक्षीस देणें योग्य आहे; ह्मणून आम्हीं तुम्हांस आपले श्वशुर करितों; यास तुम्हीं मान्य आहां कीं नाहीं?" वैद्यास ३५ राण्यांच्या परिणामांची आठवण झाली; आणि आपल्या लाडक्या कन्येस बादशहा त्याप्रमाणेंच मृत्युपंथास लावूं पाहतो, असें मनांत येऊन त्यास फार वाईट वाटलें. तो बादशहास म्हणाला, "महाराज, आपण उत्तम कुलोत्पन्न पुरुष आहां, त्याअर्थीं आमच्या सारख्या हलक्या लोकांशीं शरीरसंबंध करून आपण आपल्या वंशास हलकेपणाचा डाग लावूं नये." तें त्या बादशहानें कांहींच ऐकिलें नाहीं, आणि तावडतोब माणसें पाठवून तेंव्हांच त्या मुलीला कचेरींत आपणापुढें आणिलें.

तिला पाहतांच आज आपणापुढें साक्षात् देवांगना आहे, असें बादशहास वाटलें. तो तिशीं गालच्या गालांत हंसून कांहीं विनोदाचीं भाषणें करूं लागला. "सगळे नौकर, राज्य, खजिना, आणि खुद्द मी, हीं तुझ्या अर्ध्या वचनांत राहूं; पण तूं माझी बायको हो." असा बादशहानें तिला नानाप्रकारें पुष्कळ आग्रह केला; तरी तिनें तोंडावाटे एकही अक्षर काढिलें नाहीं. परंतु त्याच्या बोलण्याचा तिला इतका संताप आला कीं, तिला घेरी येऊन ती धाडकर तेथें पडली, आणि बेशुद्ध झाली. तिला लागलीच उठवून त्या वैद्यानें सावध केलें आणि कसेंही करून हिचें मन वळवून मी हिचें व आपलें लग्न लावून देतों, असें बादशहाजवळ कबूल करून त्यानें तिला परत आपल्या घरीं नेलें.

कचेरींत झालेलें वर्तमान अबदल्लास समजलें, तेव्हां तो फार खिन्न झाला. आणि बलसारेसही दिवसेंदिवस झुरणी लागली. ती अगदीं कृश होऊन गेली. कांहीं खाईनापिईना, आणि अबदल्ला पासून क्षणभरही दूर राहीना. आतां या संकटांतून या सुकुमार मुलीची सुटका कशी करावी हा तिच्या बापास मोठा विचार पडला; तो मोठा काल्पनिक होता, त्यानें एके दिवशीं तिला पांच चार तास गुंगी येण्याचें असें कांहीं औषध पाजिलें; आणि ती बेशुद्ध पडल्यावर ती मृत्यु पावली अशी बातमी बादशहास कळविली. त्यास ती खरी वाटली आणि त्यानें असा हुकूम केला कीं, ती आम्हांशीं लग्न करण्याच्या विचारांत असतां मरण पावली, त्याअर्थीं ती रूपवती आमचीच समजाव-याची; सबब तिचें प्रेत राजस्मशानांत, आमच्या इतर राण्यांच्या शेजारीं पुरलें पाहिजे. त्या स्मशानाच्या दरवाजावर सरकारी शिपायांचा खडा पाहरा असे.

त्या हुकुमाप्रमाणें तिला प्रेताच्या रूपानें त्या स्मशा-नांत नेलें. कांहीं काल गेल्यावर गुंगी जाऊन ती सावध झाली. परंतु त्या ठिकाणचें काम हेलिमाकडेस-च होतें, म्हणून ती गोष्ट बाहेर फुटली नाहीं. तरी तिला बाहेर काढून देऊन तिची व तिच्या प्रियकरा अबदल्लाची गांठ कशी घालून द्यावी, ह्या विचारांत तिचा पिता गढून गेला होता.

जीवर आपली परमप्रीति बसली होती, व जी आ-पणावर मनापासून फिदा होती त्या गुणवतीची आप-ल्या बापाच्या दुष्टवासनेमुळें दुर्दशा झाली हें दुःख

मनांत आणून अवदल्ला अगदीं सुकत चालला, आणि त्यास क्षयाची भावना झाली असें त्यास दिसूं लागलें. तेव्हां, बलसारेप्रमाणें त्यालाही त्या वैद्यानें गुंगीचें औषध पाजिलें; आणि तो मेला असें बादशहास कळवून त्याला प्रेताच्या रूपानें स्मशानांत नेलें. तेथें कांहीं वेळानंतर तो आपल्या प्रियेप्रमाणें सावध झाला. नंतर त्याची प्राणसखी जेव्हां त्याच्या नजरेस पडली तेव्हां त्याचा आनंद त्रैलोक्यांत मावेना! त्या दोघांनीं एकमेकांस प्रेमालिंगन देऊन कुशल गोष्टी केल्या, व आपली हकीकत एकमेकांस ऐकविली. तेव्हां त्यानें आपल्या गुरूचे व तिनें आपल्या बापाचे म्हणजे हेलिमाचे फारफार आभार मानिले.

येणेंप्रमाणें आपल्या कन्येची व राजपुत्राची गांठ घालून देऊन त्यांच्या मनांत परस्परांच्या अलभ्यतेविषयीं जी मोठी काळजी उत्पन्न झाली होती, ती हेलिमानें दूर केली. तथापि त्या उभयतांस नवीन प्राप्त जें स्मशानवासदुःख त्याच्या परिहाराचा विचार अद्यापि तसाच राहिला होता, त्याचीही त्यानें तोड काढिली ती अशी—राजकुलांतलीं जीं माणसें मृत्यु पावतात त्यांचे आत्मे स्मशानांतून पौर्णिमेच्या रात्रीं पूर्वेच्या दरवाज्यानें बाहेर पडून स्वर्गास जातात; अशी त्या काळच्या लोकांची समजूत होती. तीच तिथि दैवयोगानें त्या संधीस प्राप्त झाली, तेव्हां त्या वैद्यानें आपल्या कन्येस व राजपुत्रास असमानी रंगाच्या उंची कापडाचे बहुमोल पोषाख घातले. त्यांजवर उत्तम प्रकारचें सुवासिक तेल शिंपडिलें. कन्येच्या बुचड्यावर फार सुवासिक फुलांचा

गजरा बसविला. तसा राजपुत्राच्या पागोट्यांत सुगंध तुरा खोंविला. आणि मध्य रात्रीच्या अमलांत तुम्हीं उभयतां पूर्वेच्या दरवाज्यांतून झपाट्यानें बाहेर पडून जा असें त्यानें त्यांस सांगून ठेविलें. त्याप्रमाणें तीं बाहेर पडून गेलीं. त्यांस कोणीं कांहीं विचारिलें नाहीं. कारण तीं चाललीं तेव्हां त्यांच्या आंगचें तेज, त्यांचा उंची पोषाख, त्यांचा सुगंध, यांनीं चौकी पाहरेवाले अगदीं चकित होऊन गेले आणि हे राजपुरुषांचे आत्मे स्वर्गास चालले आहेत असें समजून ते गुपचुप राहिले. त्यांनीं तें वर्तमान दुसऱ्या दिवशीं बादशहास सांगितलें. त्यानेंही त्याविषयीं कांहीं संशय मनांत न आणितां बरें म्हटलें.

तीं तेथून सुटतांच जलदीनें शहराबाहेर गेलीं. तेथें हेलिमानें दोन उत्कृष्ट घोडे तयार करून ठेविले होते, त्यांजवर स्वार होऊन, तीं उभयतां राजधानीपासून बरींच लांब गेलीं. तेथें रानामध्यें हेलिमानें एका टेंकडीवरच्या बंगल्यांत त्यांस ठेविलें. त्यांच्या खाण्यापिण्याचीही सोय त्यानें तेथें चांगली करून ठेविली, आणि त्यांनीं त्या बंगल्याभोंवतीं लहानसा बाग वगैरे तयार करण्यांत आनंदानें बरींच वर्षें घालविलीं. इतक्यांत अल्नारस्किन मृत्यु पावला, आणि इब्राहीम गादीवर बसला; त्याची हेलिमावर फार भक्ति होती.

इब्राहीम एकदां शिकारीस बाहेर निघाला. त्याजबरोबर हेलिमही होता. अबदल्ला मरण पावल्याचें दुःख आठवून इब्राहीम वारंवार कष्टी होतांना त्या वैद्या-

च्या नजरेस येई; त्यावरून ह्या नव्या बादशहास त्याचा भाऊ भेटविला असतां त्यास मोठा हर्ष होईल असें हेलिमास पक्कें वाटलें होतें. म्हणून त्यानें त्यास एकट्यासच बोलण्याच्या नादामध्यें त्या बंगल्यांत नेलें, आणि तेथें इब्राहीम, अबदल्ला, व बलसोरा ह्या तिघांच्या भेटी झाल्या. भावांनीं एकमेकांस प्रेमालिंगनें देऊन कुशल गोष्टी केल्यानंतर आपण केलेलें सर्व कृत्य हेलिमानें त्यांस निवेदन केलें. त्याबद्दल त्या तिघांनींही त्याचे फार आभार मानिले. अबदल्ला आपल्या प्रिय पत्नीसह इब्राहिमाबरोबर राजधानीस गेला. इब्राहिमानें त्यास निमें राज्य दिलें. हेलिमास चांगलें इनाम मिळालें, आणि तीं सर्व माणसें सुखानंदानें नांदूं लागलीं.

---

## नूर जहान राणी.

विद्या, वपु, वस्त्र, वक्तृत्व, आणि वित्त, या पंच वकारांपैकीं एकादा अंगीं असल्यावांचून मनुष्यास गौरव प्राप्त होत नाहीं. पूर्वीं कनिष्ठ प्रतीचीं कांहीं मनुष्यें केवळ आपल्या सौंदर्यावरून मोठ्या पदवीस चढलीं. त्यांतच ह्या रूपवती राणीची गणना केली आहे. तिचें जन्म व चरित्र हीं फार चमत्कारिक आहेत; म्हणून तीं संक्षेपानें येथें लिहितों.

नूर जहान राणीच्या बापाचें नांव काजा आयास असें होतें. तो पश्चिमतार्तरी देशांत राहात असे. त्याचे वाडवडील पूर्वीं फार सुखी होते; परंतु कालें करून अनेक कारणांनीं त्यास अत्यंत दारिद्र प्राप्त झालें. तें इतकें

कीं, काजा आयास याला पोटभर भाकर देखील मिळे-
ना, यामुळें तो त्रासला होता. आणि दुसरें असें झालें
होतें कीं, त्यानें एका नीच कुळांतल्या स्त्रीशीं लग्न
लाविलें होतें, त्यावरून त्याच्या घरचीं माणसें त्याला
अहोरात्र ठोमणे मारीत असत. तेणेंकरून तर त्या-
ला देशत्याग करावासें झालें. त्याप्रमाणें त्यानें आ-
पल्या स्त्रीस एका म्हाताऱ्या रोडक्या घोड्यावर बसवून
व थोडीशी अन्नसामग्री बरोबर घेऊन हिंदुस्थानाची
वाट धरिली. आपण पायींच चालूं लागला. तीं
अर्ध्या वाटेस आलीं नाहींत तोंच त्यांची सगळी वाट-
खर्ची सरून गेली. उपजीविकेचा एकही पदार्थ
जवळ राहिला नाहीं, यास्तव उपास पडूं लागले.
त्याची नऊ महिन्यांची गरोदर स्त्री प्रसूत व्हावयास
झालेली असतां, त्या उभयतांस लागोपाठ तीन दिवस
कडकडीत उपास पडला. अशा संकटामध्यें ती स्त्री
एका मोठ्या अटव्य रानांतील ओसाड, भणभणीत व
भयंकर अशा अफाट मैदानांत प्रसूत होऊन, तिला
कन्या झाली. ती तर काय केवळ नक्षत्रासारखी
होती; परंतु त्या बिचाऱ्या अन्नहीन आईबापांस ती
दुष्काळांत तेरावा महिना अशी वाटली. उभयतांच्या
पोटांत जठराग्नीचा भडका पेटला होता, म्हणून पुढें
थोडी बहुत मजल करून, कोठें तरी अन्नास मिळावें
अशा हेतूनें तीं तेथून निघालीं. तेव्हां मुलीस घेण्या-
चा विचार पडला. आईनें तिला घ्यावें तर ती
तीन दिवसांची उपाशीं बाळंत, तिच्यानें रिकामें देखी-
ल घोड्यावर बसवेना. बापानें घ्यावें तर चालण्या-

नें व उपासांनीं तो अगदीं थकून गेला होता. सारांश, त्यांचेच जीव त्यांस जड झाले होते, तरी त्या दयाळु पित्यानें त्या अर्भकाला कांहीं कदमपर्यंत आपल्या पोटाशीं धरून चालविलें; परंतु पुढें त्याच्यानें त्याला नेववेना. तो इतका थकला हें पाहून त्याच्या पत्नीस फार वाईट वाटलें. तेव्हां त्यांनीं आपलीं हृदयें पाषाणासारखीं कठोर करून, व मायेचा हुंदका गटकन गिळून सर्व साक्षी व राजापासून रंकापर्यंत सर्वांचें पालन करण्यास समर्थ जो परमेश्वर त्याजकडे त्या लघुबालकास निरवून, झाडाच्या पानांत गुंडाळून रस्त्यावर ठेविलें; आणि आपण पुढें चालतीं झालीं.

कांहीं पावलें पुढें गेलीं नाहींत तों दोघें स्तब्ध राहिलीं. त्या आईच्या पोटांत मायेची उकळी फुटली. तिनें मोठ्यानें हंबरडा फोडिला. आणि उभयतांच्याही नेत्रांतून अश्रुधारा चालल्या. शेवटीं त्यांच्यानें पुढें पाऊल टाकवेना, तेव्हां काजा आयास, बायकोचें घोडें उभें करून, मुलीस आणण्यासाठीं परत गेला. तेथें एका मोठ्या फणा केलेल्या काळ्या सर्पानें मुलीभोंवतें आपल्या शरीराचें वेटाळें घातलें आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. तें पाहून तो फार भयभीत झाला. परंतु, त्याची चाऊल कळल्याबरोबर, तो सर्प मुलीस कांहींएक इजा न देतां, तेथून उठून जाऊन जवळच्या झाडाच्या ढोलींत शिरला. नंतर काजा आयासानें त्या मुलीला हळूच उचलून नेऊन तिच्या आईपाशीं दिलें. तिला पाहून त्या स्त्रीस मोठा संतोष झाला. तिनें तिचें तोंड कुरवाळिलें, मुके घेतले,

आणि मोठ्या प्रेमानें तीस पोटाशीं धरिलें. इतक्यात तेथें कोणी वाटसरू आले, त्यांनीं त्या दुःखित मनुष्यांची अशी अवस्था पाहून त्यांस कांहीं अन्नसामग्री दिली. ती वाटेनें खात खात काजा आयास आपली पत्नी व कन्या यांसहवर्तमान लाहोरास येऊन पोंचला.

त्या वेळीं त्या शहरांत अकबर बादशहा राहत असे. त्याची कांहीं दिवसांनीं काजा आयासावर चांगली मर्जी बसली. आणि पुढें त्याला सर खजीनदाराचें काम मिळालें. इतकें होत आहे तों त्याची मुलगीही वयांत येत चालली होती. तिचें लावण्य अनुपम होतें म्हणून तिला, 'म्हेरउलनिस्सा' म्हणजे स्त्रियांचा केवळ सूर्य असें नांव पडलें. ती केवळ खुप सुरत होती इतकेंच नाहीं, तर विद्या, कला, चपलता आणि चातुर्य हे गुण तिच्या ठायीं पूर्णपणें वसत होते. तेणेंकरून शहाजादा सलीम याचें म्हणजे अकबराच्या मागून जहांगीर या नांवानें जो बादशहा झाला त्याचें मन तिजवर बसलें. आणि तिनेंही त्याला कांहीं दिवस नादीं लाविलें. तो अगदीं मोहित झाला; आणि तिशीं लग्न करण्याविषयीं त्यानें आपल्या बापास विचारिलें. त्यानें तें म्हणणें नाकारिलें. तेव्हां सलीमास चुप राहावें लागलें. पुढें कांहीं दिवसांनीं म्हेर उलनिस्सेचा शीर अफकून नायक या नांवाच्या एका सरदाराशीं विवाह झाला. हें पाहून सलीमास फार राग आला; परंतु बापापुढें कांहीं चालेना म्हणून शीर अफकुनाविषयीं त्यानें नानाप्रकारच्या खोट्या कंड्या उठवून त्याला अगदीं त्रासवून सोडिलें. तेव्हां तो आपल्या

पत्नीसहवर्तमान बंगाल प्रांतांत निघून गेला. तेथच्या सुभेदारानें त्याला बरद्वान प्रांताचें काम सांगितलें तें बजावीत शीर अफकून स्वस्थ राहिला. इतक्यांत अकबर मरण पावला आणि सलीम गादीवर बसला.

आपण आतां स्वतंत्र आणि बादशहा झालों, तेव्हां म्हेर उलनिस्सेची प्राप्ति आपणास कांहीं कठीण नाहीं, असें जहांगिरास वाटलें; परंतु तिचा नवरा पराकाष्ठेचा बलाढ्य, शूर, चोखचालीचा आणि मोठा वजनदार होता, म्हणून तो बादशहा थोडासा विचारांत पडला. शीर अफकुनाचें मूळचें नांव म्हटलें म्हणजे आस्ताजिल्लो असें होतें; परंतु एकेसमयीं त्यानें सिंहास एकट्यानें ठार मारिलें होतें, त्यावरून त्याला शीर अफकून म्हणजे सिंहारी असें म्हणूं लागले. त्या पराक्रमी पुरुषास पुष्कळ आग्रह करून बादशहानें दरबारीं आणिलें आणि त्याशीं कपटाचा स्नेह पाडून आपलें काम साधून घेण्याचा बेत चालविला. तो बरोबर जमेना. एके दिवशीं बादशहा आपल्या उमरावांसह रानांत शिकारीस गेला असतां तेथें एक मोटा वाघ आढळला. त्याजवर चाल करण्याविषयीं बादशहानें आपल्या लोकांत गोष्ट काढिली. तेव्हां तीन उमराव हत्यारबंद होऊन पुढें सरसावले. तेव्हां या वेळेस आपल्या हातून हा पराक्रम घडला नाहीं तर आपल्या पूर्वकीर्तीस बट्टा लागणार असें मनांत आणून शीर अफकून पुढें आला आणि म्हणाला, "जे प्राणी शस्त्रहीन आहेत त्यांवर सशस्त्र होऊन हल्ला करणें हा न्याय नव्हे व यांत शौर्यही नाहीं. ईश्वरानें वाघास

जसे अवयव व स्नायु दिले आहेत तसे मनुष्यासही दिले आहेत. आणि मनुष्याचें शरीरबल कमी म्हणून त्याला बुद्धि दिली आहे." असें बोलून वाघावर एकट्यानें जाण्याची त्यानें बादशहापाशीं आज्ञा मागितली. तें बादशहाला मनापासून आवडलें; परंतु त्यानें प्रथमतः बाह्यात्कारें रुकार दिला नाहीं, तरी त्याचा फारच आग्रह पाहून त्यास त्याच्या मर्जीप्रमाणें बादशहानें हुकूम दिला. शीर अफकुनानें वाघावर चाल केली. त्या दोघांची बरीच वेळ झटपट झाली. शेवटीं शीर अफकुनानें वाघाचा प्राण घेतला. हें पाहून सर्वांस फार आश्चर्य वाटलें. जहांगिराच्या आशेचा भंग झाला; आणि ती विलक्षण गोष्ट चोहींकडे पसरली.

नंतर त्याला रस्त्यांत गांठून हत्तीच्या पायांखालीं तुडवून मारावें असें बादशहानें एका महातास गुप्तपणें सांगितलें. त्याप्रमाणें तो करावयास गेला; तों शीर अफकुनानें आपली तरवार उपसून तिनें हत्तीची सोंड उतरली. तो बिचारा विशाल प्राणी तत्काल मरण पावला. हें सर्व कृत्य बादशहाच्या नजरेस पडलें. तेव्हां त्यास मोठा राग आला, आणि त्यास मारायाकरितां एका सुभेदाराकडून चाळीस मारेकरी पाठविले ते त्याच्या खोलींत गेले, तेव्हां तो निजला होता. त्यासमयीं त्यांपैकींच एक असामी म्हणाला कीं, हा निजलेला आहे; तर याजवर आपण हत्यारबंद चाळीस लोकांनीं कसें जावें? त्या बोलण्यानें शीर अफकून जागा झाला. आणि त्या चाळीस असामींस जेरीस

आणून त्यांपैकीं कितीएकांस ठार मारलें, कितीएकांस अर्धमेले केले, आणि बाकीच्यांस हुसकून लाविलें. अशी त्यांची दुर्दशा केली.

या गोष्टींस त्रासून तो पुनः वरद्वान येथें जाऊन राहिला. त्यास मारण्याविषयीं बादशहानें बंगालच्या सुभेदारास हुकूम पाठविला. तो बजावण्यासाठीं, तो सुभेदार, बाह्यात्कारें कांहीं एक वांकडा रोख न दाखवितां, शिराचे गांवीं आला. त्याला शीर सामोरा गेला. तेथें वाटेंतच गोळागोळी होऊन तो शूर पुरुष प्राणास मुकला. तरी मरतां मरतां त्यानें तो सुभेदार, त्याचे दहापांच कामदार, व पांचपंचवीस शिपायी, यांस मृत्युपंथास लाविलें. या प्रमाणें शीर अफकुनाचा शेवट झाला.

नंतर म्हेरउलनिस्सेला लागलीच दिल्लीस नेली. तेथें राजवाड्यांत एका लहानशा कोठडींत तिला ठेविलें होतें. तिला प्रथमतः कांहीं दिवसपर्यंत बादशहा भेटला नाहीं. तरी तितक्या अवकाशांत तिनें कशीदा, चित्रें वगैरे काढून बरेंच नांव मिळविलें. तिचा स्वतःचा पोषाख साधा असे; परंतु आपल्या नौकरांच्या व इतर सरदार लोकांच्या बायकांच्या कपड्यांवर ती आपलें हस्त कौशल्य दाखवीत असे.

ही तिची कीर्ति बादशहाच्या कानीं गेली. तेव्हां तो मुद्दाम तिला पाहण्याकरितां, तिला न कळूं देतां हळूच तिच्या खोलींत गेला. तेव्हां ती पांढरा शुभ्र मलमलीचा पोषाक करून तक्याशीं टेंकून बसली होती. ती त्यास पाहतांच लज्जेनें खालीं तोंड करून

लवकर उभी राहिली. तिची मोहक मुद्रापाहून बादशहा भुलला. आणि तिच्या जवळ जाऊन तिला हातांत धरून म्हणाला कीं, तूं कांहीं चिंता करूं नको; मी तुला आपली पट्टराणी करितों; आणि त्या प्रमाणें लवकरच घडून आलें.

मग त्यानें तिचें नांव नूर महाल, (जनान खान्यांतील प्रकाश ), असें ठेविलें. पुनः लहर फिरली तेव्हां तें बदलून नूर जहान, (पृथ्वीचा प्रकाश ) असें नांव दिलें. बादशहाची तिजवर पूर्ण कृपा झाली. तिचें नांव नाण्यांत छापिलें. तिच्या कुळाची पदवी चढविली. आणि तिच्या आप्तांस सरकारचीं मोठमोठीं कामें सांगितलीं. राज्यांत बादशहा पेक्षां ही तिचें वजन जास्त झालें; आणि तो तिच्या अर्ध्या वचनांत वागूं लागला.

पाहा, शरीरपीडेच्या दुःखास मायाजाळानें जिंकिलें; आणि कामवासनेनें विचारबुद्धीस मागें हटविलें; या दोन गोष्टी ह्या चरित्रापैकीं फार लक्ष्यांत ठेवण्यासारख्या आहेत.

---

## बोधवचनें.

खरें बोलावें. निर्व्यसनी असावें. नेमल्यावेळीं काम करावें. प्रातः लवकर उठावें. दृढनिश्चय धरावा. प्राप्ती पाहून खर्च करावा. कबूल केल्याप्रमाणें वागावें. शरीरप्रकृतीस जपावें. गर्विष्ठ होऊं नये. कोणास दुखवूं नये. गोड बोलावें. आपलें जो काम करील त्याचे आभार मानण्यास लाजूं नये.

आपलें घरदार, वस्त्रपात्र, हीं निर्मळ राखावीं. आपल्या सामर्थ्यानुरूप सोई करून सदा आनंदवृत्ति असावें. सत्पुरुष ओळखून, मग त्याशीं स्नेह जोडावा. परस्त्रीशीं सहसा भाषण देखील करूं नये. कोणतेंही काम हातीं घेण्यापूर्वीच, हें आपणास होईल किंवा नाहीं, याचा पूर्ण विचार करावा; आणि मग तें करावयास लागावें. नाहींतर आपलें नुकसान होऊन, शिवाय उपहास ही होतो. तितकाही विचार करून काम हातीं धरिलें असतां तें आंगावर येऊं लागलें, तर घाबरूं नये. धैर्य धरून त्याची एकादी तोड काढावी. वाईट कामांत पैसा खर्चूं नये. गरिबी असली, तरी लोकांजवळ दैन्य भाकूं नये; कारण, त्यापासून कांहीं फायदा नाहीं. संपत्ति असली, तरी तिचा गर्व वाहूं नये, कां कीं, त्यापासून काहीं हित नाहीं. वाईट चालीच्या लोंकांची संगति धरूं नको. श्रीमंतांच्या मागें गुलामासारखा हिंडूं नको; तथापि, त्यांशीं सभ्य रीतीचा स्नेह ठेवणें अवश्य आहे. आपल्या योग्यतेच्या मनुष्याशीं मैत्री जोड; आणि त्याशीं निष्कपटानें वाग. तुजपेक्षां कमी पदवीचे जे असतील, त्यांशीं सौम्य रीतीनें वागत जा. दुसऱ्याच्या द्रव्यावर इच्छा ठेवूं नको.

तूं नौकर असलास तर यजमानाच्या मर्जीप्रमाणें राहून आपलीं कामें वेळच्या वेळीं बजावीत जा. त्यांशीं तोंड देखलें भाषण सहसा करूं नको. त्यानें वाईट काम करण्याविषयीं तुला कांहीं विचारलें, तर तूं त्यास मान्य होऊं नको. बोलण्याचालण्यांत आपल्या धन्याची बरोबरी करूं नको. त्याशीं मर्यादेनें रहा;

आणि कारणापुरतें थोडेंच बोल. त्याचें नुकसान होऊं देऊं नको; उलटें त्याचें हित करीत जा.—तूं यजमान असलास तर आपले नोकरलोकांस गांजूं नको. त्यांशीं सोईनें कारणापुरतें थोडकेंच बोल. त्यांचा मुशारा वेळच्यावेळीं देत जा. कुटुंबाच्या माणसांशीं गोड आणि पुष्कळ बोलत जा. आपलें आचरण चांगलें ठेवून त्यांस त्याप्रमाणें वागण्याचा वारंवार उपदेश कर. बायकोवर प्रीति कर. तूं स्वतः नेहमी कामधंदा नेकीनें करून, फावल्यावेळांत ग्रंथ वाचून ज्ञानसंपादन कर. म्हणजे त्याप्रमाणें तुझीं माणसें वागतील. मुलांच्या विद्याभ्यासाची हयगय काडीमात्र देखील करूं नको. रोज देवाची प्रार्थना कर. आणि मी पापी आहें, मी तुझा सेवक आहें, तुजवांचून मला सांभाळिता दुसरा कोणी समर्थ नाहीं, म्हणून मजवर कृपा कर, आणि माझ्या पापांची क्षमा कर, अशी त्यास अंतःकरणापासून विनंती कर; व त्यानें तुला इतकें सुख दिलें त्याबद्दल त्याचे आभार मान. परमेश्वर सर्व द्रष्टा आहे, आणि तो दुष्कर्माचें शासन करितो, हें पक्कें लक्षांत धरून लोकांत वाग. म्हणजे तुझा जन्म सुखाचा जाईल, यांत संशय नाहीं.

### आर्या.

न्यायें वागे त्यातें, होती पशु पक्षिही सहाकारी ॥
जातां अपथें सोडी, बंधूही त्रासुनी मनींभारी ॥ ९ ॥

# उद्योग.

सूक्ष्म विचार करून पाहिलें असतां, उद्योग करण्याचा स्वभाव मनुष्यमात्रास आवश्यक असून, तो परमेश्वरानें त्याचे ठायीं स्वाभाविक ठेविला आहे, असें दिसतें. तीन किंवा चार महिन्यांचें लहान मूल असतें, त्याला जरी स्वहित कळत नसतें, तरी तें, आपल्याकडून होईल तितका यत्न करून उपडें वळतें, पुढें सरतें, मागें वळतें, आणि पुढें पांच सहा महिन्यांनीं, पडत झडत, आदळत आपटत, उभें राहतें, व चालावयास लागतें. आतां वास्तविक म्हटलें म्हणजे इतक्या खटपटी वांचून त्याचें कांहीं अडलेलें असतें काय? अथवा इतके श्रम त्याजकडून कोणीं मुद्दाम करवितें काय? नाहीं. तर, हें केवळ ईश्वराच्या देणगीचें फळ आहे, यांत कांहीं संशय नाहीं.

आतां, उद्योग वृक्षाचें बीजारोपण परमेश्वरानें मनुष्यामध्यें बाळपणींच केलें असतां, व त्याचा अंकुर प्रथमतः चांगल्या जोराचा असतां, पुढें थोडक्याच अवकाशानें आळसकिडा त्यामध्यें प्रवेश करून व प्रबल होऊन त्याला कसें खुरटवितो, ह्याचा विचार करणें हें मनोरंजक असून बोधप्रद आहे. मनुष्याची निष्कामप्रीति, निष्कामभक्ति, आणि निष्काम लोभ, हीं मात्र चिरकाल निर्बाध चालतात, असें एका मोठ्या ज्ञात्याचें वचन आहे, तें कांहीं अंशीं उद्योगास लागू करतां येतें. तें असें पोरें, अगदीं अज्ञान दशेंत म्हणजे त्यांस हिताहित कळत नसतें तेव्हां, जी चळब-

ळ करितात, ती निष्काम असते; म्हणून कांहीं कालपर्यंत अखंड चालते, परंतु तें जरासें वाढून त्याला बरें वाईट, आंवट तिखट, उद्योगाचे कष्ट, आणि स्वस्थ बसण्याचें सुख यांची थोडीबहूत रुचि समजूं लागली, म्हणजे त्याच्या आचरणांत फरक पडतो. मूल दोन अडीच, अथवा प्रायः दीड पावणेदोन वर्षांचें असतां जरा अशक्त असलें तरी, पडण्याच्या दुःखाचें ज्ञान नसल्यामुळें कितीही वेळां पडून आपटलें तथापि पुनः चालण्याचा यत्न करण्यास अगदीं विलंब लावीत नाहीं; पण ती संधी जाऊन, त्याला तीन साडेतीन वर्षें झालीं म्हणजे तें उभें राहण्यास सहसा पाय धरीत नाहीं; भितें, आणि स्वस्थ बसणें हेंच त्याला मोठें सुख वाटतें; हें घरोघर सर्वत्रांस ठाऊक आहे. परंतु याचें कारण काय? तर, त्याचें उत्तर हेंच कीं, बालक अगदीं अज्ञानावस्थेंत चालण्याविषयीं जे श्रम कारितें व जीं दुःखें सोशितें, त्यांत त्याचा हेतु आपणास चालतां यावें, हा नसतो; तर केवळ जगदीशाच्या प्रेरणेनेंच तें ती चळवळ करीत असतें; म्हणजे तो श्रम निष्काम असतो; परंतु समजूं लागल्यावर, आपणास चालतां यावें, अशा सकामबुद्धीचे त्याचे श्रम असतात, त्याला त्याचें दुःख माहीत झालेलें असतें, आणि स्वस्थ बसण्याच्या सुखाची गोडी लागलेली असते, म्हणून त्याचा तो व्यवसाय अखंड चालेनासा होतो. याप्रमाणें मनुष्याच्या हृदयांत आळसाचा पाय शिरला असावा, असें दिसतें.

मनुष्य, स्थीरमनानें सूक्ष्म विचार करून पाहील,

तर सर्व सुखांचें आदिकारण उद्योग आहे, असें त्याच्या लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं. फार दूर जावयास नको; आपल्या भोंवतीच नीट अवलोकन केलें तर बस्स आहे. आपण आपणासच असा प्रश्न करावा कीं, आपलें घर दार, भांडें-कुंडें, वस्त्रप्रावर्ण, दागदागिने, बागबगीचे, इत्यादि अनेक सुखोपभोगाचे पदार्थ आपण रात्रंदिवस वापरितों, व त्यांवांचून आपलें अगदीं चालत नाहीं. ते कोणाच्या तरी श्रमांवांचून उत्पन्न झाले आहेत काय ? नाहींत. तर, त्यांस, एकाचे किंवा अनेकांचे आणि साक्षात् किंवा, पर्यायेंकरून श्रम लागले आहेत. असें अलबत मनांत येतें; तेव्हां उद्योगास सुखाचा बाप म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं, असें वाटतें.

आतां उद्योग सुखाचें बीज आहे, आणि सुख कितीही प्राप्त झालें तरी पुरेसें होत नाहीं, तर त्या प्रमाणेंच उद्योगही पुरेसा न होऊं देणें, अथवा पुरेसा न मानणें, हें मनुष्यास आवश्यक आहे. पोटच्या पुत्रासारख्या सुखावह वस्तूंपासून ही कधीं-कधीं अतिशयित दुःख प्राप्त होतें, तरी जसा आपण त्यांचा त्याग करीत नाहीं, त्याप्रमाणें, उद्योगांतही एकादे वेळीं दगा पोहोंचला, तरी त्यास सोडूं नये. सदुद्योगाचें फळ चांगलें येतेंच येतें. त्यांत एकादाडाव चुकला, तर तो दोष उद्योगाचा नव्हे; तर तो करतेवेळीं आपण कांहीं चुकलों, भुललों, अथवा भांबावलों असलों तर त्यामुळें तसें झालें, असें पक्कें समजावें. आपल्या शक्ति माफक आणि चांगलें असें कांहीं

तरी काम आपण सर्वदां करीत असावें; कधींही रिकामें राहूं नये. सर्वदां जपून उद्योग करणें हें आपल्या स्वाधीन, परंतु ती गोष्ट निर्विघ्नपणें सिद्धीस नेणें हें ईश्वराधीन आहे. असा आपला भाव असावा. कांहीं झालें तरी उद्योगास टळूं नये. उद्योगानें शेत पिकतें, उद्योगानें द्रव्य मिळतें, उद्योगानें देश काबीज होतो, उद्योगानें राजपद हातीं येतें; आणि उद्योगानेंच भगवत् प्राप्ती होते. तस्मात् उद्योग हा एक अमोल्य परीस आहे. तो ज्याच्या अंतःकरणाशीं सर्वदां लागून राहील त्यास सुखसुवर्णाची एक मोटी खाणच सांपडली असें म्हटलें पाहिजे.

**श्लोक.**

आलस्य जें कार्यविघातकारी,
असूं नये तो रिपु या शरीरीं;
उद्योग सद्बंधु तया न टाकीं,
त्या सेवितां पावसि सौख्य लोकीं ॥ १ ॥

**वामन.**

---

## कर्ज.

मनुष्यें या संसारामध्यें अनेक दुःखें भोगितात; त्यांत कांहीं निरुपायाचीं, म्हणजे न टळणारीं अशीं असतात, आणि कांहीं पहिल्यापासून सावधगिरी टेविली असतां आपणांवर न येण्या जोगीं अशीं असतात. रोग, आकस्मिक अपघातानें शरीरास इजा होणें, दारिद्र, मृत्यु, इत्यादिकांचीं दुःखें पहिल्या प्रकारचीं होत; परंतु अप्राप्त वस्तूची हांव, हेवा, द्वेष, कपट,

कर्जे, इत्यादिकांचीं दुःखें दुसऱ्या प्रकारचीं होत; आणि त्यांविषयीं पूर्ण विचारानें सावधगिरी ठेविली तर त्यांची बाधा होऊं शकणार नाहीं. त्यांपैकीं फक्त कर्जाविषयीं आतां थोडासा विचार करूं.

प्राप्ती पेक्षां खर्च कमी करणें, हा कर्ज न होऊं देण्याचा एक उत्कृष्ट उपाय आहे. "आदायापेक्षां खर्च मोटा, त्याचा होईल सदा तोटा" ही म्हण लक्ष्यांत बागवावी. जो माल लागत असेल तो रोखीनें घ्यावा; उधार कदापि घेऊं नये, उधार खरेदीनें फार नुकसान होतें. आपल्याकडून जिनसाचा पैसा तात्काल पोंचत नाहीं म्हणून, रोखीच्या गिऱ्हाइकाकडून जो नफा वाणी घेतो, त्या पेक्षां पुष्कळ अधिक नफा तो आपणा पासून घेतो; आणि तेव्हांच रोख पैसा मोजावयाचा नसल्यामुळें गरज असते त्याहून अधिक माल घेण्याची आपणास सहज इच्छा होते; आणि आपण तसें करण्यास अनुसरतों. तेव्हां अर्थात जो माल अधिक येतो तो निरर्थक जातो. व त्याचे दाम शिरावर बसतात. अशी एकदां सवय पडली म्हणजे खातें कितीही फुगलें तरी त्याची कांहीं क्षीत वाटत नाहीं. आपल्या डोक्यावर देणें किती सांचलें आहे तें पाहण्यास मनुष्यास त्रास वाटतो. मग तो निर्वाहाशीं गांठ ठेवितो; आणि खात्याकडे पाहिनासा होतो. मध्यें माल काय आणिला आणि आपण त्याचे किती दाम कधीं दिले याकडे तो लक्ष्य देत नाहीं, मग शेटजी तीनचोक तेरा करून खातें फुगवितात. नंतर "उधाराचें पोतें आणि सव्वाहात

रितें" असें झालें म्हणजे बिचारा अविचारी मनुष्य ऋण फेडितां फेडितां अगदीं डबघाईस येतो, आणि त्यानंतर जे त्याचे हाल होतात ते लिहितां पुरवत नाहींत, व लिहिण्याची गरजही नाहीं, कारण ते हमेशा लोकांच्या दृष्टीस पडतात.

रोख पैसा देऊन माल आणणें हा उत्तम पक्ष होय. कारण त्यामध्यें मालाच्या दामासाठीं मनुष्यास लागलीच पिशवी मोकळी करावी लागत असल्यामुळें तो होईल तितकी काटकसर करून, फक्त जेवढा माल अवश्य पाहिजे तेवढा मात्र घेतो. अधिक घेण्याविषयीं त्याचा हात वहात नाहीं, आणि उधळेपणाच्या घरांत जात नाहीं, म्हणून सावकाराकडे त्याचें वजन बरें राहतें हा मोठा फायदा आहे. कर्जाच्या योगानें पुष्कळ धनवान् लोक धुळीस मिळाले आहेत, यास्तव कोणत्या मालाकडे किंवा कामाकडे पैसा घालण्यापूर्वीं, "हें आपणांस पाहिजेच काय?" "यावांचून आपलें अडेल काय?" "याकडे पैसा न घातला तर ह्याच्या मोलाहून जास्त नुकसान होईल काय?" असे प्रश्न आपण आपणास करावे आणि त्यांच्या उत्तरांच्या विचाराअंतीं जें नीट दिसेल त्याप्रमाणें वागावें.

आतां मोठमोठे व्यापार मनुष्यांनीं एकमेकांचें कर्ज काढल्याशिवाय चालतात अथवा चालतील असें म्हणणें नाहीं. परंतु आपल्या नित्य खर्चाचीं बलुतीं म्हणजे, न्हावी, परीट, तांबट, कापडवाला, धान्यवाला, हीं शिलक ठेवूं नयेत. त्यांचे दाम जेव्हांचे तेव्हांच चुकवून टाकावे नाहीं तर वर सांगितल्याप्रमाणें दशा होते.

एके दिवशीं एक मनुष्य आपल्या मित्राकडे गेला आणि त्यास त्याच्याच पैशाचा जमाखर्च ठेवण्याविषयीं बोध करूं लागला, तेव्हां तो म्हणाला, "अहो हिशेब ठेवण्याचें मला कांहीं कारण नाहीं, कांकीं, मी आपल्या आदायापेक्षां जास्त खर्च करीत नाहीं अशी माझी खातरी आहे. मी कधीं कांहीं उधार आणीत नाहीं; जें घेतों त्याचे लागलेच रोख दाम देतों. यास्तव माझी शिलक काय आहे, हें माझी छोटी पिशवीच मला बिनचुक सांगते." बरोबर आहे. अशा पुरुषाच्या पिशवींत जो पैसा असेल तो खुद्द त्याचा खरा; कारण त्यांतून दुसऱ्या कोणास कांहीं द्यावयाचें नसतें; परंतु कर्जबाजारी माणसाजवळ रुपयांच्या थैल्या भरलेल्या असल्या तरी तो आपलें कर्ज फेडी तोंपर्यंत त्याची शिल्लक किती आहे हें बरोबर सांगतां येणार नाहीं.

तात्पर्य इतकेंच सांगावयाचें कीं, कर्जापासून दुःख होतें, म्हणून तें जितकें टाळवेल तितकें टाळावें, हें बरें.

---

## फळ खालीं कां पडतें?

**मुलगी**—बाबा, आज मी एक पुस्तक वाचीत होतें; त्यांत असें लिहिलें आहे कीं, झाडावरून एक फळ तुटून खालीं पडतांना न्यूतनसाहेबानें पाहिलें आणि तेवढ्यावरून त्यानें विचार करून सृष्टपदार्थांच्या धर्मांचे मोटमोटे शोध लाविले. याचा मला मोठा चमत्कार वाटतो. फळ खालीं पडण्यांत कांहीं अलौकिक अथवा अपूर्व गोष्ट आहे काय?

**बाप**—मुली, त्यांत कांहीं अपूर्व नाहीं. परंतु तेव-ढ्यावरून त्या साहेबाचें मन विचारांत मग्न झालें, ही गोष्ट खरी आहे.

**मु०**—त्यांत त्याला विचार करण्यासारखें काय आढळलें असेल तें असो. मला तर कांहीं दिसत नाहीं. बाबा, सांगा बरें मला, त्याचें चित्त कशाकडे लागलें तें ?

**बा०**—ऐक, सांगतों. तें फळ खालीं जमिनीवरच कां पडलें, ह्याचा तो विचार करूं लागला.

**मु०**—अंः; बाबा, हें मी त्याला देखील सांगितलें असतें. फळ देंटापासून तुटलें आणि वर राहण्यास त्याला कांहीं आधार नाहींसा झाला, म्हणून तें खालीं जमिनीवर पडलें यांत कांहीं मोठें नवल नाहीं.

**बा०**—हो. तूं म्हणतेस तें खरें. पण त्या फळानें स-मोर खालीं जमिनीवरच कां यावें, आणि आजूबा-जूस किंवा वर रिकाम्या अवकाशांत कां जाऊं नये ?

**मु०**—हें काय ? तें मुळीं खालीं आल्याशिवाय राहातच नाहीं.

**बा०**—पण, कां राहात नाहीं तेवढें सांग म्हणजे झालें.

**मु०**—हें नाहींबा आपल्याला ठाऊक. पण त्याला वरचा आधार नाहींसा झाला म्हणजे तें खालीं न येऊन काय करील ?

**बा०**—तें आपण होऊन खालीं येतें म्हणतेस; परंतु मुली फळ सजीव आहे काय ?

**मु०**—नाहीं.

**बा०**—बरें. निर्जिवपदार्थास तर एका जाग्यावरून दुसऱ्या

जागीं आपोआप जातां येत नाहीं, हें तुला ठाऊक आहे. तर आतां सांग बरें, फळ खालीं येण्यास कारण काय असावें तें.

मु०—त्याला अदृश्यपणें कोणी खालीं ओढीत असेल. दुसरें काय?

बा०—बरोबर. आतां ठीक बोललीस.

मु०—तर सांगा बाबा मला आतां त्या ओढणाराचें नांव?

बा०—मुली. जरा दमधर सांगतों. पदार्थ हालण्यास खुद्द त्याच्या आंगची अथवा दुसऱ्या कोणाच्या आंगची शक्ति आवश्यक आहे? फळ अचेतन व शक्तिहीन आहे त्यास स्वतः सिद्धपणें एका जाग्यावरून दुसऱ्या जागीं जातां येत नाहीं आणि तें देंटापासून सुटल्याबरोबर जमिनीवर येतें, तेव्हां असें होण्यास त्याजवर कोणत्या तरी बाह्यशक्तिचा प्रयोग घडला पाहिजे, असें मनांत आणून आणि नानाप्रकारचे अनुभव घेऊन न्यूतनसाहेबानें असें मतस्थापित केलें कीं, सृष्टपदार्थ आपणांपेक्षां लहानपदार्थांस त्यांच्या प्रकृत्यांशांच्या व अंतरांच्या मानानें आपणांकडे ओढीत असतात. त्याप्रमाणें फळ पृथ्वीपेक्षां अतिशयित लहान आहे ह्मणून त्यास तिनें त्याचा आधार तुटल्या बरोबर आपणांकडे ओढीलें. यामुळें तें तिजवर येऊन पडलें. असें त्या विद्वानपुरुषानें तें बिकट कोडें सोडविलें व त्यावरून आणखी अनेक शोध लाविले. पदार्थांच्या या आंगच्या ओढण्याच्या शक्तिस शास्त्रीपंडितांनीं आकर्षण असें नांव दिलें आहे.

मु०—हां, आतां समजल्यें. पण बाबा, आणखीं एक शंका उत्पन्न झाली आहे, तिचें आपण कृपाकरून निवारण कराल काय ?

बा.—होय मुली, बोल काय तुझी शंका आहे ती.

मु.—लहानपदार्थांस मोठेपदार्थ सर्वदा आपणांकडे ओढीत असतात, असें न्यूतनसाहेबानें सिद्ध केलें. पण आपल्या थोरल्या पाट्याशीं आपला छोटा वरवंटा जवळच पडलेला असतो त्यास पाटा कधीं ओढून घेतानां मी पाहिला नाहीं, हें कसें?

बा.—पाटा, त्या वरवंट्यास आपणाकडे ओढून घेत असतो, ही गोष्ट खोटी नव्हे, खरी आहे, परंतु त्या दोघांसही त्यापेक्षां लक्षावधिपट मोठी जी पृथ्वी ती आपलेकडे ओढीत असते, ह्मणून पाट्याचें सामर्थ्य चालत नाहीं.

मु.—बाबा आतां मला पक्कें समजलें.

---

## पृथ्वीच्या पृष्ठभागांत फेरफार.

सृष्टिक्रमाच्या गोष्टी कांहीं फेरबदल न होतां, एकसारख्या घडताना हमेषा दृष्टीस पडतात. तेणेंकरून ह्या भूगोलाच्या पृष्ठभागाची रचना जशी हल्लीं दिसते तशीच प्राचीन काळापासून आहे व पुढेंही चिरकाल तशीच राहील, असें मनांत येतें; परंतु ही केवळ भ्रांति आहे. जी गोष्ट दृष्टोत्पत्तीस येण्यासारखी वाढण्यास शेंकडों वर्षें लागावयाचीं ती घडतांना मी साक्षात् डोळ्यांनीं पाहीन तेव्हां खरी मानीन, असें कोणी म्हणू लागेल तर तें कसें शोभेल? शोभणार नांहीं.

तर अशा गोष्टींविषयीं प्राचीन लेखांवरच संपूर्ण वि-श्वास ठेविला पाहिजे. शोध करून पाहूं लागल्यास ज्याच्या स्थलरचनेमध्यें पांच चारशें वर्षांत फेरबदल झाला नाहीं असा देश या पृथ्वीवर सांपडणें कठीण पडेल. हे फेरफार होण्यास अनेक कारणें आहेत. त्यांत जलाशय अग्रगण्य होय. एकादा मोठा जल-प्रवाह जेव्हां उंच पहाडी पर्वतावरून मोठ्या वेगानें खालीं वहात येतो तेव्हां तो आपल्या आजूबाजूंवरील माती, रेती, धोंडे, खडकाचे तुकडे, इत्यादिक पदार्थ सखल प्रदेशांत आणितो. पुढें त्याला खालीं जसज-सें सपाट व रुंद पात्र सांपडत जातें तसतसे त्यांतील जड पदार्थ तळीं बसत जातात आणि तेणें करूनच नद्या, सरोवरें इत्यादिकांचीं पात्रें दिवसें दिवस उथळ होत जातात. तो प्रवाह समुद्रास मिळतो, तेव्हां त्या-मध्यें अवशेष राहिलेला जो माती वगैरेचा गाळ असतो, तो त्याच्या मुखाच्या बाजूस जाऊन बसतो. त्याजवर भरतीच्या वेळीं समुद्राच्या लाटांनीं रेती येऊन पडते, पुनः तिजवर गाळाचा थर जमतो. असें होतां होतां कालांतरें करून त्याची उत्कृष्ट पिकाऊ जमीन बनते. मग तेथें मनुष्यांची वस्ती होऊं लागते; आणि कांहीं वर्षां-नीं कदाचित् शहर ही वसतें. याचीं उदाहरणें पु-ष्कळ देतां येतील. खालच्या ईजिप्ताचा बहुतेक भाग नैल नदींतून गाळ येऊन सदरीं लिहिल्याप्रमाणेंच बनला आहे.—होन नदीच्या मुखाजवळचें सुंदर बन गेल्या अठराशें वर्षांत सुमारें चार साडेचार कोस वा-ढलें आहे. याचें प्रमाण इतकेंच कीं, तेथील कांहीं

गांव जे पूर्वी अगदीं समुद्रतीरीं होते ते आतां त्यापासून बरेच कोस दूर आढळतात. यावरून त्या गांवांचें स्थलांतर झालें असें म्हणावें काय ? तर तसें अगदीं देखील म्हणतां येत नाहीं. नद्यांचा गाळ त्यांच्या मुखांशीं बसवसून तेथील जमीन समुद्राकडे वाढत गेली आणि तो मागें हटला हें खचीत आहे. आद्रिया शहर पूर्वी अगदीं समुद्रकिनाऱ्यावर होतें तें आतां त्यापासून बरेच अंतरावर आहे, असें होण्याचें कारण पो नदी, दुसरें कांहीं नाहीं. या प्रमाणें हमेषा नवीन भूमि होऊन पृथ्वीच्या पृष्ठभागाच्या रचनेंत फेरबदल होत असतो.

नवीन बेटें होणें हा एक पृथ्वीच्या पृष्टभागांत फेरफार होण्याचा प्रकार आहे. ज्वालामुखांनीं झालेलीं अशीं बेटें फार थोडीं आहेत; परंतु प्रवाल कीटकांनीं केलेलीं फार आहेत. हे कीटक समुद्रामध्यें उष्ण कटिबंधांत फार असतात आणि ध्रुवाकडे उत्तरोत्तर कमी होत जातात. ते हिंदी महासागरांत, आफ्रिकेच्या किनाऱ्यावर व आरबी समुद्रांत पुष्कळ आहेत. हे यःकश्चित् किडे मनुष्यांस देखील दुष्कर असें जें बेट बांधण्याचें काम तें कसें करितात तें, कितीएक जलपर्यटनकर्त्यांनीं समक्ष पाहून त्याविषयीं लेख करून ठेविले आहेत. त्यांतील एकाचें तात्पर्य येणेंप्रमाणें:—

"भरतीचें पाणी चढूं लागल्यापासून तिची पूर्णता होईतोंपर्यंत हे किडे काम करतांना पाहणें हें मोठ्या मौजेचें आहे. पाणी चढूं लागण्यापूर्वीं तो खडक अगदीं

शुष्क व फार टणक असा दिसतो, व त्यांत कोणीं जीव असतील असें मनांत देखील येत नाहीं; परंतु लाटा त्याजवर हळूहळू जाऊं लागल्या म्हणजे, तें कीटक आपापल्या भोंकांतून भराभर बाहेर पडतात आणि आपल्या कामास लागतात. ते बारीक, मोठे, लांब, आंखूड, वाटोळे, असे अनेकप्रकारचे असतात. त्यांनीं आपले कामाची सुरवात केली म्हणजे त्या खडकाचा पृष्ठभाग, जणु काय जिवंत होऊन वळवळतो आहे असें दिसतें. लुचू बेटा जवळचे प्रवाल कीटक चार-पासून सहापर्यंत इंच लांबीचे असतात. ते नेहेमी आप-णांभोंवतींच भ्रमण करीत असतात, ते बहुधा भक्ष्यार्थ असावे असें वाटतें. दुसरे काळ्यारंगाचे चार पांच इंच लांब व दोन तीन इंच रुंद, असे आढळतात. ते इतके मंद असतात कीं, ज्यास माहिती नाहीं तो ते दगड म्हणून कदाचित उचलून घेईल. जेथपर्यंत समुद्राचें पाणी पोहोंचण्याची सीमा असते तितका उंच तो खडक निमुळता होत होत वाढत जातो आणि मग तितकाच बंद होतो. नंतर त्याच्या बाजू वाढत जाऊन तितक्या उंच होतात, तेणेंकरून त्याचा पृष्ठभाग सारखा होऊन जातो."

याप्रमाणें दगडी बेट तयार झाल्यावर समुद्राच्या लाटांनीं त्याजवर गाळ जमतो, दगड येऊन पडतात, पुनः त्यावर मातीचा थर बसतो, अशी तेथें पिकाऊ जमीन तयार होते. तिजवर पक्ष्यांच्या तोंडांतून किंवा समुद्राच्या पाण्यांतून बीं पडतें, तें तेथें उगवतें मग त्यांत पशुपक्षी राहूं लागतात आणि सरशेवटीं 'आय-

त्या विळावर नागोबा,' याप्रमाणें मनुष्याची स्वारी तेथें जाऊन तेथला राजा होऊन बसते.

याप्रमाणें नवी भूमि उत्पन्न होत आहे, समुद्र मागें हटत आहे, व कोठें कोठें पुढें येत आहे आणि याशिवाय धरणीकंप व ज्वाला मुखी यांहीं अनेक फेरफार होत असतात. इतकेंच कीं, त्या सर्वांचें वर्णन करूं लागल्यास एक निराळा मोटा ग्रंथच होईल. तस्मात् पृथ्वीच्या पृष्ठभागांत कांहीं फेर बदल होत नाहीं असें जें आपले मनांत येतें तें भ्रांतीमूलक आहे असें समजावें.

---

## हिंदुस्थान.

हें या देशाचें नांव आहे. सर्व भुगोलविद्येच्या अभ्यासामध्यें आपणास ह्या देशाच्या वर्णनाकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे. म्हणून त्याची माहिती थोडक्यांत संक्षेपानें लिहितों.

**नांव.**—पारशी भाषेंत हिंदु म्हणजे काळा; आणि इराणांतील लोकांपेक्षां या देशाचे लोक काळे आहेत. यावरून त्यांनीं आम्हांला हिंदु हें नांव दिलें असावें; आणि त्यापासून हिंदुस्थान हा शब्द झाला असावा असें बहुमत आहे.

**सीमा.**—उत्तरेस हिमालय पर्वत, पूर्वेस ब्रम्हपुत्रानदी, व आराकान देशांतील डोंगर, आग्नेयीस व कांहीं पूर्वेस बंगालचा उपसागर, दक्षिणेस हिंदीमहासागर आणि पश्चिमेस सिंधुनद.

**विस्तार.**—दक्षिणेस कन्याकुमारी केपापासून तों उ-

तरेस हिमालयाचे शिखरापर्यंत लांबी सुमारें १८८० इंग्लिश मैल; पूर्व पश्चिम रुंदी सुमारें १६२० इंग्लिश मैल आणि त्यांचें एकंदर क्षेत्रफळ सुमारें १२,८०,००० इंग्लिश चौरस मैल आहे.

**लोकसंख्या**—हिंदुस्थानांत सुमारें तेराकोटि मनुष्यें आहेत. यावरून दर चौरस मैलास थोड्याशा कसरीनें सुमारें शंभर मनुष्यें पडतात.

**मोठमोठीं शहरें**.—कलकत्ता, काशी, प्रयाग, आग्रा, दिल्ली, लखनौ, मिरत, इंदूर, ग्वाल्हेर, वडोदें, अमदाबाद, हैद्राबाद, पुणें, मुंबई, मद्रास इत्यादी अनेक शहरें या देशामध्यें आहेत.

**पर्वत**—हिमालय, सह्याद्रि विंध्याद्रि, अरवली, चितूर हारावती, राजमहाल, आणि सातपुडा, हे मोठमोठे पर्वत आहेत. हिमालयाइतका उंच दुसरा कोणताही पर्वत या पृथ्वींत नाहीं. त्याचें सर्वांत उंच शिखर चिमऌागिरी, तें सुमारें २९,००० फूट उंच आहे

**नद्या**.—गंगा हिला यमुना, गोमती इत्यादि तेरा मोठाल्या नद्या मिळतात; सिंधु, ब्रम्हपुत्रा, नर्मदा, तापी, महानदी, महीनदी, साबरनदी, गोदावरी, कृष्णा, घटप्रभा, मलप्रभा, तुंगभद्रा, भीमा, कावेरी, प्रवरा इत्यादि.

**सरोवरें**.—चिलका हें ३५ मैल लांब व ८ मैल रुंद आहे; यांत अनेक बेटें आहेत. या शिवाय कोलेर, पलिकात, होनावर, ताल, मानस, दल, मानसबल, उलूर इत्यादि अनेक सरोवरें हिंदुस्थानांत आहेत.

**हवा**.—या देशाचा बहुतेक भाग उष्णकटिबंधाखालीं आहे; तेव्हां, याची हवा उष्ण असली पाहिजे, हें सह-

ज समजतें; तथापि उष्णतेचें मान सर्व जागीं सारखें नसतें. पाहा.

| | | |
|---|---|---|
| मुंबईस, सरासरी उष्णतेचें मान | .... | ८२ अंश. |
| नीळगिरीस, | .............. | ५६ अंश. |
| मद्रासेस | .............. | ८४ अंश. |
| धारवाडास | .............. | ७५ अंश. |
| कलकत्त्यास | .............. | ७९ अंश. |

इत्यादि.

**उत्पन्न**—गहूं, सातू, बरग, तांदूळ, नाचणी, हरभरा, तूर, ज्वारी, बाजरी, मका, राई, ऊंस, कापूस, तीळ, नीळ, वेलदोडे, आलें, मिरीं, हळद, ज्येष्ठमध, तमाखू, ताग, वाख, खसखस, आंबा, फणस, नारळ, सुपारी, द्राक्षें, अननस, अंजीर, नारिंग इत्यादि. यांशिवाय वेळू, बाभूळ, शिसवा, साग, चिंच इत्यादि अनेक वृक्ष इमारती बांधण्यास लायक असे असतात.

**जनावरें**—हत्ती, वाघ, चिता, तरस, सिंह, गेंडा, गवा, आस्वल, रानडुकर, लांडगा, खोंकड, कोल्हा, ससा, वानर, हरण इत्यादि वनपशु आहेत, आणि घोडा, गाढव, हत्ती, उंट, डुकर, गाय, बैल, म्हैस, रेडा, शेळी, बकरें, कुतरें, मांजर इ० ग्राम्यपशु आहेत. यांखेरीज राघू, चिमणी वगैरे रानांत असणारीं अनेक जातीचीं पांखरें आहेत व कांसव, मगर, मत्स्य, खेंकडे वगैरे पाण्यांतले जीव आहेत.

**लोक व जाति**—या देशांत हल्लीं अनेक जातींचे लोक राहतात. त्यांची जात, भाषा, आणि संख्या यांचें संक्षिप्त टिप्पण येणेंप्रमाणें:—

| जात. | भाषा. | लोकसंख्या. |
| --- | --- | --- |
| बंगाली. | बंगाली. | २,५०,००,००० |
| मराठे. | मराठी. | १,२०,००,००० |
| गुजराथी. | गुजराथी. | ६०,००,००० |
| तैलंग. | तैलंगी. | ८०,००,००० |
| द्राविड (तामल). | तामल. | ७०,००,००० |
| कानडे. | कानडी. | ५०,००,००० |
| हिंदी. | हिंदी. | २,००,००,००० |

याशिवाय मुसलमान, सूर्यानी, यहुदी, ख्रिस्ती, आरब, आरमिनी, पारशी, इराणी, अफगाणी, तार्तार, तुर्क, हबशी, पोर्तुगीज, इंग्लिश, डच, फ्रेंच, डेन्स आणि चिनी, ह्या जातींचे कितीएक लोक येऊन हिंदुस्थानांत राहिले आहेत.

राज्यव्यवस्था अगदीं प्राचीनकाळीं या देशांत हिंदू राजे लहान लहान प्रांतांवर राज्य करीत असत. त्यानंतर त्यांस जिंकून या देशाचा बहुतेक भाग मुसलमानांनीं काबीज केला. त्यांची राजधानी दिल्ली होती. त्यांच्या अमलांत एका मराठ्यानें या महाराष्ट्र देशांत गादी स्थापून आपलें नांव गाजविलें. तें त्याच्या वंशजांनीं व प्रधानांनीं कांहीं वर्षें चालविलें. पुढें हा देश इंग्लिशांच्या हातीं गेला. त्यांचें राज्य हल्लीं फार आनंदानें चाललें आहे. हिंदुस्थानाचा मुख्य अधिकारी गव्हरनर जनरल, तो कलकत्त्यास असतो. मुंबई, मद्रास येथील गव्हरनरांस त्यांच्या आज्ञेत वागावें लागतें. गव्हरनर जनरल साहेबांस १५ असामींचें एक कौन्सिल आहे. त्याप्रमाणेंच मुंबई व मद्रास

येथील गव्हरनरांस आहेत. ह्यांच्या राज्यांत न्याय, लोकहिताचीं कामें, लोकांच्या मालाचें, जिवाचें व स्वतंत्रतेचें संरक्षण, विद्या आणि व्यापार यांचा भरभराट हीं चाललीं आहेत, ईश्वर करो आणि यांचें राज्य या देशांत अखंड असो.

---

## लार्ड क्लैव.

कांहीं एकादी चमत्कारिक गोष्ट घडल्याची वार्ता कानीं आल्यास, तिची हकीकत ऐकण्याची इच्छा मनुष्याच्या मनांत स्वभावतःच उत्पन्न होते; आणि तिजमध्यें ज्यांचें विशेष वर्णन असतें, त्यांचीं चरित्रेंही त्यास ऐकावींशीं वाटतात. आतां इंग्लिश लोक आपण हरहमेष आपणांभोंवती पाहातों; त्यांचा राज्याधिकार आमच्या आंगवळणीं पडून गेला आहे. त्यांचे पोषाख व रीतिभाती, नेहमींच्या सहवासानें आपणांस अगदीं साधारण झाल्या आहेत. याच कारणामुळें त्यांचा व त्यांच्या अचाट कृत्यांचा आपणांस चमत्कार वाटत नाहीं; परंतु वास्तविक म्हटलें म्हणजे, इतक्या दूरच्या बेटांतून या देशांत व्यापाराच्या मिषानें येऊन त्यांनीं येथें एवढें विस्तीर्ण राज्य स्थापित केलें, ही गोष्ट चमत्कारिक व विचार करण्यासारखी आहे. आणि तिजमध्यें लार्ड क्लैव साहेबाच्या हातून पुष्कळ मोटमोठ्या गोष्टी घडल्या आहेत, तेव्हां तोही पुरुष कोणत्या प्रकारचा होता हें समजणें अवश्य आहे, म्हणून त्याचें चरित्र थोडक्यांत लिहितों.

इंग्लंदांत श्रापशायरमध्यें रिचर्ड क्लैव या नांवाचा एक गृहस्थ राहत असे, तो वकिलीचें काम करून थोडा बहुत व्यापारही पाहत असे. त्यानें मांचेस्तर येथील गासकिल नांवाच्या एका स्त्रीशीं लग्न केलें. पुढें तो मोठा कुटुंबवत्सल झाला. त्यांत त्याचा वडील मुलगा राबर्त क्लैव. म्हणजे ज्याला पुढें लार्ड क्लैव असें नांव प्राप्त झालें तो, इ० स० १७२५ च्या सप्तंबर महिन्याच्या २९ व्या तारखेस जन्मला. तो लहानपणीं फार द्वाड व भांडखोर होता. त्याला अल्प कारणांवरूनही फार राग येत असे. त्यानें उंच उंच झाडांवर चढावें; आपल्या एवढाल्या पोरांची झुंड बरोबर घेऊन द्वाडपणा करीत सगळ्या गांवभर फिरावें; दुकानांचीं तावदानें, दगड मारून फोडण्याचें भय दाखवून, दुकानदारांपासून पैसा पैसा किंवा अधेला अधेला खाऊसाठीं उपटावा; बापानें ज्या शाळेंत घालावें, तिजमधील पोरांशीं मारहाण करून शिक्षकाला शिव्या द्याव्या, आणि शाळेंतून निघावें, असे त्याचे लहानपणचे गुण होते. ह्यापासून आपणांस सुख प्राप्त होण्याची आशा नाहीं, असें त्याच्या घरचीं सगळीं माणसें म्हणत असत; परंतु तो मोठा पराक्रमी निघेल असें त्याच्या एका शिक्षकानें भविष्य केलें होतें. तेंच शेवटीं खरें झालें.

अशा प्रकारें तो अंमळसा बराच वयांत आला, तेव्हां त्याच्या घरच्या माणसांनीं असा विचार मनांत आणिला कीं, हा येथें असा भटक्या मारीत फिरतो त्यापेक्षां एकादा हलका सलका कामधंदा करील तर बरें.

त्याप्रमाणें त्यांनीं ईस्त इंदिया कंपनीच्या मद्रास येथील कारखान्यांत कारकुनीची जागा मिळविण्यासाठीं त्याला गलबतांत बसवून या देशाकडे लावून दिलें. तें गलबत मुक्काम करीत करीत आलें. यामुळें हिंदुस्थानांत पोंहोंचण्यास त्याला एक वर्षाहूनही अधिक दिवस लागले. ब्राझिल देशांत तें कांहीं दिवस राहिलें होतें, तेथं क्लैवसाहेबानें पोर्तुगीज भाषेचा थोडासा अभ्यास केला; परंतु तो या देशांत येऊन उतरेपर्यंत त्याच्या जवळची सगळी खर्ची संपली.

क्लैवसाहेब आला त्यावेळीं या देशामध्यें इंग्लिशांचें राज्य नव्हतें. ते येथें फक्त व्यापार करीत असत. त्यांस एतद्देशीय लोकांच्या तंत्रानें वागावें लागे. मोंगल नवाब, निजाम हे आपापल्या राज्यांत स्वतंत्रतेची उच्चस्थिति पावून सिंहासारखे गुरगुरत असत. त्यांच्या मुलखांत त्यांच्या हुकुमावांचून पान देखील हालत नसे. इंग्लिश लोकांस तेव्हां कोणी पुसत देखील नव्हतें; परंतु कालचक्र फिरून सर्वच स्थिति बदलली आहे. या देशांतील तेव्हांचे इंग्लिश, आणि आतांचे इंग्लिश यांजमध्यें जमीन अस्मानाचें अंतर आहे. पाहा, तेव्हां ते व्यापारी होते, आतां राज्याधिकारी झाले; तेव्हां त्यांच्या ताब्यांत मालाच्या वखारी मात्र असत, आतां दारूगोळ्यानें भरलेले पुष्कळ मजबूद किल्ले आहेत; तेव्हां ते कीर्द खतावण्या लिहीत, आतां ते निवाडे व मुकदमे लिहितात; तेव्हांच्या इंग्लिश कारकुनांस जो पगार मिळे तो त्यांच्या निर्वाहास देखील पुरत नसे, पण ते आतां बहुधा क्रोडो-

पति झाले आहेत. सारांश, तेव्हां ते सावकार होते आणि आतां सरकार होऊन बसले आहेत, असो.

क्लैवसाहेब हिंदुस्थानांत आल्यावर त्याची अगदी दशा उडाली. त्यानें ज्या मोठ्या लोकांस आपल्या शिफारसीचीं पत्रें बरोबर आणिलीं होतीं ते तो पोहोंचण्यापूर्वींच विलायतेस निघून गेले होते. जवळ पैसा नव्हता म्हणून त्याला कर्ज काढावें लागलें. सर्वदा लिहिण्याचें कामाचा त्याला फार कंटाळा होता; तेंच त्यास फार पडूं लागलें; त्याची कोणाची ओळख नव्हती; हवा मानेना व प्रकृति बिघडली, तेव्हां त्याचें सगळें ध्यान घराकडे लागलें. अशा अवस्थेंत असतां त्यानें आपल्या घरीं एक पत्र लिहिलें त्यांत त्याचे शब्द असे आहेत कीं, "घर सोडल्यापासून आजपावेतों माझा एकही दिवस सुखाचा गेला नाहीं. काम झाल्यावर फावल्या वेळीं मला जेव्हां इंग्लंदची आठवण होते तेव्हां फार वाईट वाटतें.....जगदीशकृपेनें माझें प्रिय इंग्लंद आणि त्यांत विशेषेंकरून मांचेस्तर, जर माझ्या पुनः दृष्टीस पडेल तर माझे सर्व मनोरथ एकदम सिद्धीस गेले असें मला वाटेल." या दुःखांत त्याला एक सुख होतें तें असें कीं, मद्रासच्या गव्हरनराजवळ पुष्कळ पुस्तकें होतीं त्यांतून जें पाहिजे तें त्याला वाचायास मिळत असे.

बरें, इतकें झालें तरी त्यानें आपला दांडगा व हट्टी स्वभाव सोडिला नव्हता. आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्यांशीं तो बाचाबाच करी, त्यांस तो उलटून बोले व त्यांचें ऐकत नसे. अशा गुणांनीं त्याचें पुष्कळांशीं वांकडें

पडलें, आणि नौकरीवर पाणी पडण्याचाही प्रसंग आला. या कटकटींत तो इतका त्रासला होता कीं, आत्महत्या करून घेण्यासाठीं त्यानें दोनवेळ पिस्तुलें भरून आपणाकडे उडवून घेतलीं, तरी तीं दोन्ही चुकून त्याचा बचाव झाला. तेव्हां तोच म्हणाला कीं, दारू वगैरे बरोबर असतांही जर दोन वेळ मी बचावला गेलों, तर यावरून माझ्या हातून काहीं तरी मोठ्या गोष्टी व्हावयाच्या आहेत म्हणून असें होतें यांत संशय नाहीं.

याप्रमाणें बरेच दिवस गेल्यावर मद्रास येथें एक मोठी भयंकर गोष्ट घडून आली ती अशी कीं, फ्रेंचांचा लाबरदोनस नामक सरदार मोठ्या फौजेनिशीं एकाएकीं त्या शहरावर हल्ला करावयास आला, तेव्हां तेथच्या लोकांनीं भिंती मजबूद नसतांही पांच दिवसपर्यंत शत्रूशीं टक्कर दिली. शेवटीं निरुपाय होऊन त्यांनीं किल्ला शत्रूच्या स्वाधीन केला.

ता. १० सप्टेंबर १७४६.

लाबरदोनसानें आंत शिरून सर्व सामान आपल्या ताब्यांत घेतलें आणि सांपडलेल्या इंग्लिश लोकांस कैद केलें, आणि तुम्हांकडून ठरविलेला पैसा नेमल्या वेळीं आल्यास मी तुम्हांस सोडीन व मद्रासही परत देईन असें त्यानें त्यांस वचन दिलें. त्यानें आपल्या वचनाप्रमाणें सर्व केलें असतें; परंतु त्याचा वरिष्ठ अधिकारी डुपली यानें मध्यें खो घातला. तो म्हणाला कीं, कोणत्याही प्रकारचा ठराव करण्यास लाबरदोनसाला अधिकार

नाहीं वास्तव, त्यानें केलेली बोली आम्हांस कबूल नाहीं. आणि त्यानें धरलेले सगळे इंग्लिश लोक पांदिचरीस नेले, आणि तेथें त्यांची फार अप्रतिष्ठा केली. त्यांत मद्रासचा गव्हरनर वगैरे वडे लोकही होते. पांदिचरीस पाठविण्याची जेव्हां धराधर झाली तेव्हां या चरित्राचें आदिपात्र, छोटा कारकून, पण मोठा हुशार असा जो क्लैव साहेब तो शत्रूच्या तावडींतून निसटून जाऊन, मध्यरात्रीच्या सुमारास मुसलमानाच्या वेषानें किल्ल्यांतून बाहेर पडला, आणि सेंत देविद येथें जाऊन आपल्या लोकांस मिळाला.

आपले गुण प्रकट करण्यास व आपलें आवडतें लष्करी काम पतकरण्यास क्लैव साहेबाला हा फार चांगला संधि सांपडला. त्यानें पलटणींत प्रथमतः एनसाइनचा हुद्दा धरिला. तेव्हां तो २१ वर्षांचा होता. पुढें लवकरच सेंत देविद किल्ल्यावर हल्ला आला, तेव्हां त्यानें युद्ध करण्यांत असें कांहीं आपलें शौर्य व चातुर्य दाखविलें कीं, मोठमोठे जुनाट सरदार देखिल त्याचें फार आश्चर्य करून राहिले. फ्रेंचांशीं लढाई चालली असतां त्याची शिताबी मेझर लारेन्स म्हणून जो मोठा सेनापति होता त्याच्या नजरेस आली. तेव्हांपासून त्याची जिकडे तिकडे बरीच कीर्ति झाली.

याप्रमाणें लष्करांत काम करायास लागून फार दिवस झाले नाहींत तों फ्रेंच आणि इंग्लिश यांचा युरोपांत तह ठरल्याची बातमी आली, आणि मद्रास इंग्लिशांस परत मिळाली. तरी जे इंग्लिश

व फ्रेंच हिंदुस्थानांत होते, त्यांच्या मधलें वैर नष्ट झालें नाहीं. त्या दोन्ही मंडळयांच्या मनांत हिंदुस्थानचें राज्य मिळवायाचें होतें, म्हणून कांहींना कांहीं तरी कुसपट काढून एकमेकांशीं भांडत असत; परंतु उघडपणें लढत नसत. या अवकाशांत क्लैव साहेब कधीं कारकुनीचें काम करी, व प्रसंग पडे तेव्हां लढाईस जाई.

पुढें थोडक्याच दिवसांनीं अशा कांहीं गोष्टी घडून आल्या कीं, त्यांत क्लैव साहेबाच्या शौर्याविषयीं लोकांची बालंबाल खात्री झाली. त्या गोष्टी अशा कीं, इ. स. १७४८ त निजाम उल्मुल्क मरण पावला, आणि त्याचें राज्य त्याचा मुलगा नासिरजंग हा चालवूं लागला. त्याप्रमाणेंच कर्नाटकचें राज्य अनवरुद्दीन करीत होता. या दोघांस दोन शत्रु उत्पन्न होऊन, त्यांच्या राज्यासाठीं भांडूं लागले. नासिरजंगाच्या शत्रूचें नांव मिरजाफाजंग, हा निजाम उल्मुल्काचा नातु होता. आणि अनवरुद्दीनाच्या शत्रूचें नांव चंदासाहेब; तो अर्काटच्या पूर्वीच्या नबावाचा जावई होता. या दोघां बंडखोरांनीं ४,००० फौज जमवून आपणांस मदत देण्याविषयीं फ्रेंचांचा मुख्य गव्हरनर दुपली यास विनंती केली. हिंदुस्थानांत कशा रीतीनें तरी कलागती उत्पन्न होऊन त्यांत आपला हात शिरावा अशी त्याची बहुत दिवसांपासून इच्छा होती ती पूर्ण होण्यास हा संधि उत्कृष्ट आहे असा विचार मनांत आणून त्यानें ती विनंती मोठ्या आनंदानें मान्य केली; आणि त्यांच्या साह्यार्थ दि आतिल

नामक आपल्या सरदाराबरोर कवाईत शिकलेले २००, काळे, व ४०० गोरे इतकें सैन्य पाठविलें. तें बंडखोरांच्या सैन्यास मिळाल्यावर त्या सर्वांनीं, करनाटकचा नवाब अनवरुद्दीन २,००० लोकांसह अंबूर येथें होता त्याजवर हल्ला केला. तेथें उभयपक्षाचीं लहानशी लढाई झाली तींत फ्रेंच सेनेचा जय होऊन नवाब मारला गेला व त्याचा मुलगा महंमद अल्ली हा त्रिचनापल्लीस जाऊन बसला. तों त्याच्या मागोमाग जाऊन फ्रेंच व त्यांनीं बनविलेला नवा नवाब चंदासाहेब यांच्या एकत्र झालेल्या फौजेनें त्या किल्ल्यास वेढा घातला.

याप्रमाणें चंदासाहेबास करनाटकची नवाबगिरी प्राप्त झाली. दुसऱ्या, म्हणजे नासिरजंगाच्या पक्षाची-ही तशीच वाट झाली. तो आपल्या शत्रूशीं लढतां लढतां व तह करतां करतां अगदीं जेरीस आला होता. त्यास त्याच्याच लोकांनीं ठार मारिलें व मिरजाफाजंगास निजामाची गादी मिळाली. ह्या दोन गोष्टींनीं दुपलीस फार संतोष झाला. नव्या निजामानें दुपली साहेबास कृष्णानदी व कन्याकुमारी केप यांजमधील प्रदेशाच्या गव्हरनरचा अधिकार दिला. शिवाय त्याचा अंमल चंदासाहेबावर चालावा, ७,००० फौज साहेबांचे ताब्यांत असावी व पांदिचरी खेरीज दुसऱ्या कोणत्याही जागीं कर्नाटकांत नाणें पडूं नये या गोष्टींस निजाम कबूल झाला. निजामाच्या खजिन्यांतलें सर्व द्रव्य दुपलीनें घेतलें. त्यांत वीस लक्ष रुपये नक्त होते. त्यांखेरीज सोनें व हिरे

हीं किती किमतीचीं सांपडलीं हें बरोबर समजलें नाहीं. निजाम दुपलीच्या मताशिवाय एक देखील काम करीत नसे. सारांश नवाब आणि निजाम हे उभयतां नांवाचे राजे असून, सगळा कारभार फ्रेंचांकडे होता असें म्हटलें तरी चालेल.

फ्रेंच लोक मध्यहिंदुस्थानांत असें वैभव पावले तेव्हां त्यांच्याविषयीं एत्तद्देशीय लोकांत किती दाब बसला असेल व महंमद अल्लीस त्रिचनापल्लींतून मुक्त करण्यासाठीं इंग्लिशांनीं केलेले यत्न निष्फल झालेसें पाहून, त्यांच्या कमकुवतपणाविषयीं त्यांस काय वाटलें असेल हें सांगावयास नको. उघडच आहे. या देशांत फ्रेंच लोकांपेक्षां इंग्लिशांचा अंमल अधिक चालेल किंवा त्यांच्या मदतीनें महंमद अल्ली सुटेल असें तेव्हां कोणाच्या मनांत देखील येत नव्हतें. कारण त्या प्रसंगीं त्यांची अवस्था तशीच होती.

यावेळीं क्लैवसाहेब २५ वर्षांच्या वयाचा असून त्याला कप्तान ही पदवी मिळाली होती. बुद्धिमान्, शूर व समयसूचक अशा या तरुण पुरुषास त्या अणीबाणीच्या प्रसंगीं एक उत्कृष्ट युक्ति सुचली ती त्यानें लागलीच आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्यांस सांगितली. तो म्हणाला कीं, शत्रूशीं सामना करण्याजोगें आपणाजवळ सैन्य नाहीं, त्याअर्थी महंमदअल्लीस सोडविण्यासाठीं त्रिचनापल्लीच्या वेढ्यावर चालून जाणें व्यर्थ आहे; परंतु, नवाबाची राजधानी अर्काट शहर आहे, त्यांत फारशी फौज नाहीं, त्याजवर जाऊन हल्ला केला असतां त्रिचनापल्लीच्या वेढ्याचे लोक त्याच्या रक्षणा-

र्थ तिकडे जातील, आणि मग तेथून महंमद अल्लीची सहज सुटका होईल. ही "नाकधरून तोंड उघडण्याची मसलत" सर्वांस आवडली, आणि त्या कामावर त्यांनीं त्याचीच योजना केली.

दोनशें गोरे व तीनशें काळे लोक बरोबर घेऊन क्लैव साहेब अर्काटावर गेला तेव्हां वारा, पाऊस, मेघगर्जना व विद्युल्लता यांचा मोठा धडाका चालला असतांही हा एवढेंसें सैन्य घेऊन हल्ला करावयास आला असें पाहूनच त्याच्या धैर्याचा व शौर्याचा लोकांनीं अदमास केला; आणि फार भयाभीत होऊन ते रस्तोरस्तीं पळूं लागले; तेणेंकरून तें शहर अनायासें त्याच्या स्वाधीन झालें. आपणांस हें अर्काट मिळालें तरी यास लौकरच वेढा पडणार आहे असें समजून क्लैव साहेबानें पुढची तजवीज चालविली. वेढा पडल्यावर अन्नसामग्री, दारूगोळा वगैरेची अडचण पडूं नये म्हणून त्यानें अगोदर सगळी बेगमी करून ठेविली आणि शहरांतून धुडकावून लाविलेले जे लोक जवळच्या झाडींत दबा धरून राहिले होते त्यांजवर मध्यरात्रीं एकदम हल्ला करून त्याची कत्तल उडविली.

हें वर्तमान त्रिचनापल्लीच्या वेढ्यांत कळतांच चंदासाहेबाला फार वाईट वाटलें आणि त्यानें अर्काट परत येण्यासाठीं ४,००० लोक बरोबर देऊन आपला मुलगा राजासाहेब यास तावडतोब रवाना केलें. त्याला अर्काटांतून हाकून दिलेले कांहीं लोक मिळाले. शिवाय २,००० लोक वेलोराकडून त्याच्या

मदतीस आले, आणि १५० लोक पांदिचरीहून फ्रेंचांनीं पाठविले. अशी एकंदर सहा सात हजार फौज त्याजजवळ जमली आणि तिनें अर्काटच्या किल्ल्यास वेढा दिला, तेव्हां आंतील इंग्लिश लोक मोठ्या संकटांत पडले. कारण किल्ल्याचा तट अगदीं मोडकळीस आला होता, खंदक खडखडीत कोरडा पडला होता व शत्रूच्या माऱ्यावर तोफा लावण्याचीही बिलकुल सोय नव्हती; हा स्थलाचा प्रकार झाला. आतां आंतील व्यवस्था पाहा—कप्तान क्लैवसाहेब मुख्य अधिकारी, त्याच्या हाताखालीं लहान लहान पदव्यांचे चार अंमलदार होते; १०० गोरे आणि ३०० काळे असे एकंदर ४०० शिपाई होते आणि अन्नसामग्री सरत आली होती.

अशी स्थिति आंत असतां बाहेर एकसारखा ५० दिवस वेढा पडला होता; क्लैवसाहेब मोठ्या दक्षतेनें व धैर्यानें शत्रूपासून आपलें संरक्षण करीत होता व अन्न सरल्यामुळें शिपाई उपाशीं मरूं लागले. अशा अणी-बाणीच्या प्रसंगीं भिन्न जातींचे, भिन्न रंगांचे, भिन्न धर्मांचे आणि भिन्न भाषा बोलणारे एतद्देशीय लोक क्लैवसाहेबाच्या आज्ञेंत वागून भूक ताहान सोसून लढत होते, ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. याहून-ही अधिक चमत्कार वाटण्यासारखी एक गोष्ट घडली ती अशी.—इंग्लिश शिपायांचा उपयोग लढाईच्या कामांत आपणांपेक्षां फार पडतो असें पाहून एतद्देशीय शिपायांनीं आपल्या खुषीनें साहेबास अशी विनंती केली कीं, धान्य सरत आलें आहे त्यापेक्षां

तांदुळांचा जो भात होत जाईल तो गोरे लोकांस द्यावा आणि त्यावरची पेज आम्हांस द्यावी, म्हणजे तिजवर आम्ही आपला कसा तरी निर्वाह करूं.

अर्काटचा वेढा उठविण्याविषयीं मद्रास सरकारानें होता तितका प्रयत्न केला, तरी त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं, परंतु मुरारिराव म्हणून जो सरदार ६,००० लोकांनिशीं त्या प्रांतीं होता त्यानें क्लैवसाहेबास साहाय्य करण्याकरितां त्या शहराकडे चाल केली. हें समजतांच राजासाहेब अगदीं घाबरून गेला, व त्यानें क्लैवसाहेबापाशीं तहाचें बोलणें लाविलें तें त्यानें नाकारलें आणि "आम्ही शहरावर हल्ला करूं, तें लुटूं आणि लोकांची कत्तल उडवून टाकूं" अशा गर्वोक्तीचा निरोप त्यानें क्लैवसाहेबास पाठविला. त्याचा क्लैवसाहेबाला मोटा राग आला आणि त्यानें त्यास असा परत जबाब पाठविला कीं, "तुझा बाप राज्याचा मालक नाहीं, तो बंडखोर आहे व त्याच्याकडचे सगळे लोकही बंडवाले आहेत; आणि असे बुळके निरोप आमच्या लष्करांत पुनः पाठविशील तर तूं खूप विचारानें राहा."

नंतर लौकरच मुसलमान लोकांचा एक मोटा सण आला होता त्याच दिवशीं राजासाहेबानें किल्ल्यावर हल्ला केला. तेव्हां क्लैवसाहेब दमून भागून नुकताच आपल्या बिछान्यावर पडला होता व त्याला थोडीशी डुलकीही येत होती. इतक्यांत बाहेरच्या गडबडीचें वर्तमान त्यास समजलें. मग तो लागलाच उठून आपल्या तयारीस लागला. शत्रूनें आपल्या

सैन्यापुढें मोठमोठे हत्ती सोंडांस हत्यारें बांधून आणिले होते ते फार अनर्थ करितील असें पहिल्यानें वाटलें होतें; परंतु इंग्लिश तोफखान्याची चमक त्यांच्या दृष्टीस पडल्याबरोबर त्यांनीं मागच्या मागें पळ काढिला आणि ज्यांनीं त्यांस लोटीत लोटीत पुढें आणिलें होतें त्यांस त्यांनीं पायांखालीं तुडवून चांगली शिक्षा केली. तरी खंदकांत जेथें बिलकूल पाणी नव्हतें तेथून किल्ल्यांत शिरण्याचा वेढा घालणारांनीं यत्न केला; परंतु शेवटीं इंग्लिशांकडील गोळयांच्या भडिमारामुळें त्यांस मागें हटावें लागलें (ता. १४ नोवेंबर १७६२). त्या तांतडींत मनाप्रमाणें काम चालेना म्हणून क्लैवसाहेब जातीनें तोफा उडवूं लागला होता. या लढाईंत शत्रूकडील ४०० लोक पडले; परंतु इंग्लिशांकडचे सहांपेक्षां अधिक जांया झाले नाहींत. दुसऱ्या दिवशीं तुमुल युद्ध होईल या काळजीनें आंतले इंग्लिश लोक रात्रभर झुरत होते; परंतु दिवस उगवतांच बाहेर पाहतात तों एकही मनुष्य त्यांच्या दृष्टीस पडलें नाहीं. कांहीं तोफा मात्र तेथें पडलेल्या दिसल्या. शत्रू सर्व पळून गेले होते.

हें वर्तमान कळतांच मद्रास येथें मोटा आनंद झाला. क्लैवसाहेबास लोक मोटा योद्धा मानूं लागले. ७०० काळे व २०० गोरे इतकें लष्कर त्याच्या मदतीस रवाना झालें. हें, क्लैवसाहेबाजवळ होतें तें आणि मुरारीरावाचें ६,००० इतकें सैन्य एकत्र होऊन वेढा घालणारांच्या मागें लागलें, तेव्हां राजासाहेबाजवळ ५,००० फौज होती तींत ४०० फ्रेंच होते.

या उभयपक्षांच्या सैन्याची गांठ पडून लढाई झाली तींत राजासाहेबाचा सर्व दारूगोळा इंग्लिशांच्या हातीं लागला व त्याचे ६०० शिपाई त्याचें लष्कर सोडून इंग्लिशांच्या नौकरीस राहिले. नंतर कांजीवरम किल्ला इंग्लिशांस अनायासें मिळाला आणि अरनीच्या सुभेदारानें चंदासाहेबाचा पक्ष सोडून महंमदअल्ली आपला नवाब असें कबूल केलें, म्हणजे तो इंग्लिशांकडचा झाला.

अशा प्रकारें इंग्लिशांची चढाई होत चालली तेव्हां लढाई, तह वगैरे करण्याच्या कामांची मुक्त्यारी जर क्लैवसाहेबाकडे असती तर शत्रु लवकरच नाहींसे होऊन लढाई मिटली असती; पण तसा प्रकार मुळींच नव्हता. क्लैवसाहेब हुकमाचा नौकर होता तेणें-करून राजासाहेब आपल्या लोकांची पुनः जमवाजमव करून मद्रासच्या आसपास आला, आणि त्यानें साहेबलोकांचे बंगले व बागबगीचे मोडून उद्ध्वस्त करून टाकिले, तेव्हांही क्लैवसाहेबानें त्याजवर चालून जाऊन त्याच्या बरोबरच्या ४०० फ्रेंचांपैकीं १०० लोक मारून टाकिले. हे १,००० काळ्या लोकांपेक्षांही अधिक समजले पाहिजेत. यानंतर तो लवकरच आपल्या सैन्यासह सेंतदेविद किल्ल्याकडे गेला. जातांना वाटेंत दुपलीनें उभा केलेला स्वजयस्तंभ त्यास आढळला तो त्यानें लागलाच पाडून टाकिला.

सदरीं सांगितलेल्या गोष्टींवरून क्लैवसाहेबाची लोकांत फार वाहवा झाली, आणि स्वसत्ता वाढविण्याविषयीं इंग्लिशांस अधिकाधिक उमेद येत चालली.

पुष्कळ सैन्य बरोबर देऊन क्लैवसाहेबास महंमदअल्ली-च्या सहायास त्रिचनापल्ली येथें पाठवावें असें ठरत आहे इतक्यांत मेजर लारेन्स साहेब विलायतेहून आपल्या कामावर परत आला, तेव्हां क्लैवसाहेबास त्याच्या हुकुमांत वागणें भाग पडलें. इतक्या कीर्तीस चढल्यावर क्लैवसाहेब दुसऱ्याच्या हाताखालीं वागेल असें त्याच्या मूळच्या स्वभावावरून कोणास वाटलें नव्हतें; परंतु त्यानें कांहींएक गडबड केली नाहीं. मेजर लारेन्स साहेब त्याचा चांगला मान राखीत असे. आणखीं त्यानें त्याजविषयीं एका जागीं असें लिहिलें आहे कीं, "लोक क्लैव साहेबाला नुसता दैवशाली म्हणोत; परंतु त्याची मला जी माहिती आहे तिजवरून माझें मत असें आहे कीं, जें कांहीं त्यास प्राप्त झालें आहे तें त्याच्या योग्यतेप्रमाणें त्यास अगदीं बरोबर आहे. दृढनिश्चय आणि समयसूचकता हीं या पुरुषाच्या हृदयांत निरंतर जागृत असतात व हा उपजत योद्धा आहे. कारण कोणत्याही विद्येचा फारसा अभ्यास केला नसतां व कोणत्याही कामांत फारसा वापरलेला नसतां हा एकाद्या जुन्या आनुभविक सेनापतीप्रमाणें आपली फौज शत्रूवर अशा उत्कृष्ट रीतीनें नेतो कीं, तिला जय आल्यावांचून राहातच नाहीं."

आतां त्रिचनापल्लीस वेढा घालणाऱ्या लोकांची काय अवस्था झाली ती पाहा. त्यांस इंग्लिशांच्या फौजेनें वेढिलें. चंदासाहेब इंग्लिशपक्षाचे जे मराठे त्यांच्या हातीं सांपडला व त्यांनीं त्यास मारून टाकिलें. दुपली-

ची कांहीं राज्यप्रकरणावरून फ्रान्स देशांत नाचक्की होऊन त्याला तिकडून मदत मिळेनाशी झाली सारांश फ्रेंचांच्या सत्तेस उतरती कळा लागली.

यानंतर फ्रेंच लोकांकडचे कावेलंग व चिंगलपट हे दोन किल्ले घेण्याचा क्लैव साहेबानें निश्चय केला. त्यानें आपल्या हाताखालीं २०० गोरे नुक्तेच विलायतेहून आलेले होते ते व ५०० काळे नवीन नौकरीस ठेविलेले होते ते, असे एकंदर ७०० लोक घेतले. ते सगळे कवाईत शिकलेले नसून लढाईच्या कामांत इतके शूर होते कीं, कावेलंग किल्ल्यास वेढा घातल्यावर आंतून शत्रूनें एक तोफेचा आवाज काढिला तो कानीं पडतांच त्यांपैकीं बहुतेक जीव घेऊन पळाले, व कितीएक तर विहिरींतून दडून बसले, ते पुढें दुसऱ्या दिवशीं बाहेर निघाले. तरी अशा लोकांस चांगले तयार करून क्लैव साहेबानें त्यांजकडूनच तो किल्ला घेवविला. तो परत घेण्यासाठीं शत्रूचें सैन्य येत होतें त्याचा चिंगलपटापर्यंत पाठलाग करून त्याही किल्ल्यास वेढा दिला आणि आतां वाट पाडून आंत शिरणार इतक्यांत शत्रूच्या लोकांनीं किल्ला सोडला. असे दोन्ही किल्ले घेऊन क्लैवसाहेब मोठा जयजयकार करीत मद्रासेस गेला.

त्या ठिकाणीं त्यानें मास्कीलेनी नामक एका सभ्य स्त्रीशीं लग्न लाविलें आणि हवेनें व श्रमांमुळें त्याची प्रकृति बिघडली होती म्हणून तो आपल्या प्रिय पत्नीसह गलबतांत बसून विलायतेस गेला.

तेथें दुपलीचीं सर्व कपटकृत्यें लोकांस कळलीं

होतीं व त्यांतून पार पडून क्लैवसाहेबानें इंग्लिशांच्या झेंड्याची कशी बढती केली हें प्रसिद्धच होतें; तेणें-करून तो तेथें पोंहचतांच लोकांस फार आनंद झाला. सरकारी कामगारांनीं ईस्त इंदिया हौसमध्यें त्याचा मोठा सन्मान केला. कंपनीनें त्याचे उघडपणें पुष्कळ आभार मानिले व त्याच्या सन्मानार्थ त्यास एक रत्नखचित मुठीची तलवार देऊं लागले तेव्हां लारेन्ससाहेबाचा असा मान राखल्यावांचून मी तिचा स्वीकार करणार नाहीं असें बोलून त्यानें तो नजरणा नाकारिला.

आपला जो मुलगा लहानपणीं इतका द्वाड आणि दांडगा होता तो मोठमोठीं कामें करून चांगल्या अवरूस चढला हें क्लैवसाहेबाच्या बापास प्रथम खरें वाटेना; परंतु त्यानें जेव्हां त्याचें वैभव खुद्द आपल्या डोळ्यांनीं पाहिलें तेव्हां त्याची खात्री झाली. त्यानें येतांना बरोबर बरेंच द्रव्य आणिलें होतें तें त्यानें बापास ऋणमुक्त करण्यांत, आप्तविषयांस देण्यांत व ऐषआरामांत खर्चिलें. आणि आपणास पार्लमेंट सभेमध्यें सभासदाची जागा मिळण्याविषयीं पुष्कळ यत्न केले; परंतु ते सर्व व्यर्थ गेले.

नंतर पुनः हिंदुस्थानांत जाण्याची आपली इच्छा त्यानें कंपनीस प्रदर्शित केली. तिलाही त्याची फार गरज होती म्हणून तिनें त्याला संतदेविद येथील गव्हरनर नेमून त्यास इ० सन १७५५ त हिंदुस्थानांत पाठविलें.

हिंदुस्थानांत पोंहोचल्यावर त्यानें जंजिरा (गिर्या)

म्हणून जो आंग्रे नामक यांच्यांचा किल्ला होता त्यावर स्वारी केली आणि तो घेतला. नंतर क्लैवसाहेब सेंतदेविद येथें जाऊन आपलें काम पाहूं लागला.

पुढें बंगाल्यांत मोठी धामधूम झाली. इ०स० १७५६त त्या प्रांताचा नवाब अलिवर्दीखान मृत्यु पावल्यावर त्याची गादी त्याचा नातु मूर्ख, स्वेच्छाचारी, दुर्व्यसनी, दुष्ट आणि महा कपटी असा जो सुराजउद्दवला त्यास मिळाली. मग काय? "पिशाच्या हातीं कोलती" अशी अवस्था झाली. त्यानें लोकांनीं सांगितलेला बुद्धिवाद ऐकूं नये, लबाड लोकांच्या संगतीनें मूर्खपणांत वेळ घालवावा, दारू आणि वेश्या यांचा नाद अमर्याद, राज्यव्यवस्था पाहण्याच्या नांवानें भोपळ्याएवढें पूज्य, अशी त्याची स्थिति झाली. आणि नित्याच्या संवयीनें त्याचा क्रूरपणा इतका वाढला कीं, तो आपल्या कर्मणुकीसाठीं कधींकधीं मनुष्यांचेही जीव घेऊं लागला. हा दुष्ट दुरात्मा लहानपणापासूनच इंग्लिशांचा द्वेष करीत असे, आणि त्यांजपाशीं जें कांहीं द्रव्य जमलें असेल तें एकदम लुटून आणण्यास कांहीं तरी निमित्त शोधून काढण्यास तो फार दिवस टपला होता. इतक्यांत फ्रेंच लोकांच्या भयानें इंग्लिश लोक आपल्या ठाण्याची डागडुजी करूं लागले त्याविषयीं त्यांनीं त्याची परवानगी घेतली नव्हती हें एक; आणि कोणी श्रीमान सावकार त्याच्या प्रांतांतून निघून जाऊन कलकत्त्यामध्यें इंग्लिशांच्या आश्रयानें राहिला होता त्यास त्याच्या मनांत बुडवायाचें होतें; परंतु ते त्यास त्याच्या ताब्यांत देतना हें दुसरें.

अशीं दोन कारणें धरून त्या क्रूरानें मोठ्या सैन्यानिशीं कलकत्त्यावर इ० स० १७५६ जून महिन्यांत स्वारी केली.

हें प्रचंड सैन्य अशा क्रूर पुरुषाबरोबर आपणावर हल्ला करण्यासाठीं येत आहे अशी बातमी कलकत्त्याच्या गव्हर्नरास कळतांच तो तेथून जळमार्गानें पळून गेला. शत्रु आल्यावर किल्ल्यांतील लोकांनीं कांहीं वेळपर्यंत धैर्य धरिलें होतें; परंतु नवाबाच्या धडाक्यापुढें त्यांचा टिकाव निघेना. शेवटीं त्यानें तो किल्ला घेतला, आंतील सामान जप्त केलें आणि सांपडलेल्या इंग्लिश लोकांस कैदेंत घातलें. तेथें इंग्लिशांचें अपरिमित द्रव्य असावें असा त्याचा अजमास होता तो व्यर्थ झाला. त्याला फक्त ५०,००० रु. मात्र त्यांच्या खजिन्यांत सांपडले. तेव्हां हालवेल नामक एका इंग्लिश मनुष्यास पुढें आणून त्याची अप्रतिष्ठा करून त्यास आणखी खजीना कोठें आहे म्हणून नवाबानें विचारिलें; परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. नंतर तुमच्या जीवास कांहीं धक्का नाहीं असें इंग्लिश कैद्यांस सांगून तो निजावयास गेला.

नबाबानें जीवांविषयीं अभयवचन दिल्यावरून इंग्लिश कैद्यांच्या मनांतली धास्ती कमी होत चालली होती; परंतु लागलाच त्यांजवर संकटाचा प्रसंग गुदरला. वीस फूट औरसचौरस एक अंधारकोठडी होती तींत त्या १४६ इंग्लिश कैद्यांस नवाबाच्या शिपायांनीं कोंदकोंदून भरलें आणि तिचें दार बंद करून त्यास कुलूप लाविलें. थोडा वेळ गेला नाहीं तोंच

आंतील लोक गुदमरून मोठ्यानें ओरडूं लागले अरे, आम्हांस बाहेर काढा, आमचे प्राण वांचवा, पाणी पाजा, नाहीं तर नबाबसाहेबांजवळ आमची दाद तरी लावा, अशी नानाप्रकारें त्यांनीं बाहेरच्या शिपाई-लोकांची विनवणी केली, परंतु तिजकडे कोणी लक्ष दिलें नाहीं. ते आंतल्याआंत गुदमरून आणि कासावीस होऊन एकमेकांवर पडत आणि शिपाईलोक त्यांची बाहेरून मजा पाहात. असे ते पाषाणहृदय शिपाई!! त्यांस भूतदया कशी ती ठाऊक देखील नव्हती असें वाटतें. प्रातःकाळीं त्या दुष्टांनीं नबाबाच्या हुकुमावरून कोठडीचें दार उघडून आंतले सगळे लोक ओढून बाहेर काढले तेव्हां २३ मात्र जिवंत होते आणि बाकी १२३चीं प्रेतें होऊन पडलीं होतीं.

अशीं क्रूर कर्मे करून व किल्ल्यावर आपले लोक ठेवून सुराजउद्दवला मुर्शिदाबादेस परत गेला आणि तेथें स्वस्थ चैन करीत राहिला.

इकडे ही दुःखकारक वार्ता मद्रास येथें आगस्ट महिन्यांत समजली, आणि कलकत्ता परत घेण्यासाठीं ९०० गोरे लोक व ५०० काळे लोक इतकें सैन्य रवाना झालें. त्यांत पायमार्गानें जाणाऱ्या फौजेचा अधिकारी क्लैव साहेब होता व जलमार्गानें जाणारीचा वाट्सन होता. हें दिसेंबर महिन्यांत कलकत्त्याजवळ येऊन पोंहचलें. हें वर्तमान नबाबास कळतांच तोही आपल्या फौजे-सहित तेथें आला. इतक्यांत आंतील लोकांस जर्जर करून किल्ला क्लैव साहेबानें आपल्या हस्तगत करून घेतला. हें इंग्लिशांचें धैर्य व बल पाहून नबाबास

भय वाटूं लागलें, आणि त्यानें त्याशीं तहाचें बोलणें लाविलें. आणि मागच्या स्वारीच्या वेळीं ताब्यांत घेतलेल्या त्यांच्या वखारी, त्यांतील माल व तेव्हां झालेल्या नाशाबद्दलचा योग्य पैसा इतकें देण्यास तो कबूल झाला. त्याप्रमाणें तह ठरला. त्यांत वाट्सन साहेब व उमीचंद नामक एक बंगाली सावकार हे प्रमुख होते. त्या तहास फार दिवस झाले नाहींत तोंच त्या दिर्घद्वेषी कोडग्या नवाबानें पुन्हा आपलें सैन्य कलकत्त्याजवळ आणिलें; परंतु तेथें इंग्लिशांचा कडीकोट बंदोवस्त पाहून तो मागें हटला, आणि त्यांच्या म्हणण्याप्रमाणें पुनः त्यांशीं तह केला.

इंग्लिशांनीं त्यास इतकें जर्जर केलें तरी त्याची द्वाड खोड गेली नाहीं. सदरीं सांगितलेला तह करून राजधानीस आल्याबरोबर इंग्लिशांस हिंदुस्थानांतून अजी घालवून देण्याच्या हेतूनें त्यानें चंद्रनगर येथील फ्रेंचांची मदत मागितली ती त्यांनीं मोठ्या उत्सुकतेनें कबूल केली. हें सगळें वर्तमान क्लैव व वाट्सन या सरदारांस समजलें. त्यांनीं लागलाच चंद्रनगरावर हल्ला केला आणि तें घेतलें; व तेथें सांपडलेल्य ५०० फ्रेंच लोकांस कैद केलें. याप्रमाणें इंग्लिशांनीं एका शत्रूस पाडाव करून दुसऱ्याचीही वळवळ मोडली.

ही अवस्था पाहून नवाबास कांहीं सुचेनासें झालें. त्याच्या करण्यांत व बोलण्यांत कांहीं नेम राहिला नाहीं. आज इंग्लिशांच्या पक्षाचें बोलावें; उद्यां फ्रेंचांस मेजवान्या कराव्या असा कांहीं चमत्कारिक क्रम त्यानें धरिला. तो नेहमीं हलक्या लोकांत भलभलत्या

मसलती करीत बसे. तेणेंकरून राज्यव्यवस्था पाहण्यास त्याला बनेना. देशांत बंदोबस्त व न्याय नाहींसा झाला. त्यामुळें सरकारी कामगार, सुखवस्तु रयत लोक व व्यापारी लोक हे सर्व त्याला अगदीं कंटाळून गेले. तेव्हां त्या मूर्ख नवाबास पदच्युत करण्याविषयीं त्याच्याच लोकांनीं कट केला. त्यांत नवाबाचा खजीनदार राय दुर्लभ, स्वाराचा मुख्य सरदार मीरजाफर आणि सर्व हिंदुस्थानांत श्रीमंत सावकार कलकत्याचा जगच्छेट हे मुख्य होते. त्यांनीं तो बेत कलकत्त्याच्या इंग्लिश अधिकाऱ्यांस गुप्तपणें कळविला. तेव्हां कितीएक इंग्लिश लोक त्याला रुकार देईनात; परंतु क्लैवसाहेबानें त्यांचीं मनें वळवून त्यांना त्या गोष्टीस कबूल केलें. इतक्यांत मला गादी दिल्यास मी तुमच्या म्हणण्याबाहेर तिळभर देखील वागणार नाहीं असा मीरजाफराचा त्यांस निरोपही येऊन पोंहोचला. तेव्हां सगळी सिद्धता झाली असें कटवाल्यांस वाटलें. नंतर नवाबास भुलथाप देण्यासाठीं क्लैवसाहेबानें त्याला असें खुशामतीचें एक पत्र लिहिलें कीं, तें वाचून पहिल्यापासून तो निष्काळजी होऊन स्वस्थ मजेखालीं चैन उडवीत राहिला. तें पत्र ज्या जासुदाबरोबर रवाना केलें होतें त्याबरोबरच कपटी क्लैवसाहेबानें वाट्सन साहेबाला एक पत्र लिहून पाठविलें. त्यांत त्यानें असें लिहिलें होतें कीं, "कांहीं झालें तरी भिऊं नको. कधीं अपजय पावले नाहींत अशा ५,००० लोकांसह मी तुला येऊन मिळतों. मी रात्रीचा दिवस करून तुजकडे

लौकर येतों आणि मजपाशीं सरशेवटीं एक शिपाई राही तोंपर्यंत मी तुला सोडणार नाहीं असा माझा निरोप मीर जाफरास अगत्य कळवावा."

कटाची तयारी झाली तों मध्येंच एक लचांड उद्भवलें तें असें.—कटाची कांहीं गुणगुण नबावाच्या कानावर गेली, तेव्हां त्याच्या पूर्ण भरंवशाचा उमीचंद नामें एक बंगाली व्यापारी त्या कटांत सामील होता त्यानें त्याच्या मनांतला संशय उडवून टाकिला. तरी त्यास द्रव्यलोभ उत्पन्न होऊन त्यानें अशी अड घातली कीं, तीस लक्ष रुपये मला मिळतील किंवा सर्व व्यवस्था जिकडे तिकडे झाल्यावर ती रकम मला मिळावी, अशाविषयीं ठरावाचें कलम जर कटाच्या कृत्यांच्या एकंदर यादींत पडलें, तरच मी उगा राहीन; नाहीं तर सगळी हकीकत नबावास कळवीन. ही अड कशी काढावी याचा सर्वांस मोठा विचार पडला, तेव्हां क्लैवसाहेबानें असा विचार केला कीं, ही वेळ मागेंपुढें पाहण्याची नव्हे. कोणत्या तरी युक्तीनें आपलें काम साधून घेतलें पाहिजे, म्हणून त्यानें कटाचे ठरावांच्या दोन यादी केल्या. एक पांढऱ्या कागदावर, ती खरी होती आणि दुसरी तांबड्या कागदावर, ती खोटी होती. तींत उमीचंदाच्या म्हणण्याप्रमाणें कलम लिहिलें होतें, पण पांढऱ्या कागदावर त्याचें नांव देखील नव्हतें. तांबड्या खोट्या यादीवर कपटपातकास भिऊन वाट्सन साहेब सही करीना, तेव्हां त्याची सही क्लैवसाहेबानें स्वहस्तें केली आणि तो तांबडा कागद दाखवून त्या द्रव्यलोभी लुच्चा सावका

राचें तोंड बंद केलें. नंतर मग सर्व बेत पुनः गुप्त-पणें बरोबर चालला.

जिकडे तिकडे सर्व तयारी झाल्यावर क्लैवसाहेबानें नवाबास एक पत्र पाठविलें त्यांत त्याजकडून घडले-ल्या सगळ्या आगळिकींचा उल्लेख आणून शेवटीं मोठ्या धमकीनें असें लिहिलें होतें कीं, तुम्हीं आ-म्हांस दुःखदायक अशीं आजपावेतों जीं कृत्यें केलीं आहेत त्याचीं कारणें विचारण्यास आम्ही तुम्हांकडे सैन्यांसुद्धां येत आहों; तुम्हीं तयार असावें. एवढ्या सूचनेवरून तो धूर्त नवाब सर्व प्रकार समजला आणि ४०,००० पायदळ, १५,००० स्वार व ५० तोफा, इतकें सैन्य बरोबर घेऊन त्यानें काशिमबाजारा-जवळ प्लासी येथें तळ दिला. क्लैवसाहेबही आपल्या फौजेसहवर्तमान कासिमबाजारापर्यंत आला. लढाईचा परिणाम काय होईल याची त्या दोघांसही मोटी का-ळजी पडली. क्लैवसाहेबाला तर रात्रभर झोंप आली नाहीं. नवाबाचें सैन्य मोठें, आपलें लहान, अशा विचारांनीं त्याचें मन वारंवार अस्वस्थ होत असे. आपलें एवढें सैन्य असतांही इंग्लिश लोक यःकश्चित् फौज घेऊन मोठ्या डौलानें आपणाशीं लढावयास आले हें त्यांचें धैर्य पाहून नववाच्याही पोटांत धाक पडला. असें होतां होतां उजाडलें आणि प्रातःकाळीं नवाबाच्या फौजेनें चाल करून इंग्लिशांच्या सैन्यावर गोळ्यांचा वर्षाव सुरू केला. इंग्लिशांकडीलही गोळी-बार चालू झाला. त्यांजकडे तोफा थोड्या होत्या, परंतु त्याचें काम एकसारखें व्यवस्थेनें झटपट चाल-

लें होतें तेणेंकरून शत्रूच्या लोकांस त्यांचा मार सोसवेना, तेव्हां ते सैरावैरा पळत सुटले. अशी दाणादाण पाहून नवाबही समरंगणांतून पळून गेला. त्याच्या सर्व तोफा व इतर सामान इंग्लिशांच्या हातीं लागलें. या लढाईंत शत्रूचे ५०० लोक पडले व इंग्लिशांचे २२ मेले, आणि ५० जखमी झाले.

नंतर मीर जाफर क्लैवसाहेबाकडे आला, त्याचा त्यानें चांगला मान राखिला, आणि तेव्हांपासूनच तो नवाब असें त्यास म्हणूं लागला.

रणांतून पलायन केल्यावर २४ तासांनीं सुराज उद्दवला मुर्शिदाबादेस पोंहोचला, आणि तेथें आपले मंत्री बोलावून आणून पुढला विचार चालविला. इतक्यांत मीर जाफर शहरांत आल्याची बातमी त्यास कळली, तेव्हां तो प्राणभयानें भिकाऱ्याचें रूप धरून आणि उत्तम रत्नांनीं भरलेली लहानशी पेटी आपणाबरोबर घेऊन २ विश्वासु नौकरांसह शहराबाहेर निघून गेला. पुढें बऱ्याच दिवसांनीं त्याला पकडलें आणि एका अंधार कोठडींत घालून मीर जाफराचा मुलगा मीरन यानें त्यास ठार मारिलें

लढाईचें काम उरकतांच क्लैवसाहेबानें मीर जाफराला मुर्शिदाबादेस राज्याभिषेक केला. नंतर ठरावाच्या यादीप्रमाणें सर्व कामें अमलांत आणण्याचा विचार करण्याकरितां सगळी मंडळी जगच्छेटाच्या घरीं जमली तींत तीस लक्ष रुपयांचे मनांत मांडे खात उमीचंदही गेला. सर्व जागच्या जागीं बसल्यावर क्राफ्टन साहेबाकडे वळून क्लैवसाहेब इंग्रजींत बोलला,

"उमीचंदास भ्रांतिमुक्त करण्याची हीच वेळ आहे" नंतर साहेब उमीचंदाकडे तोंड फिरवून म्हणाला, "तांबड्या कागदाचें ठरावपत्र खोटें बनावट आहे. तुम्हांला कांहींएक मिळावयाचें नाहीं." हें ऐकतांच तो सावकार मूर्छित होऊन धाडकर जमिनीवर पडला आणि तेव्हांपासून तो भ्रमिष्ट होऊन पुढें थोडक्याच दिवसांनीं मृत्यु पावला.

या वेळीं इंग्लिशांवर तर द्रव्याचा केवळ पाऊसच पडला. फक्त रुप्याचें नाणें ऐशीं लक्ष रुपयांचें मुर्शिदाबादेहून कलकत्त्यास गेलें. शिवाय हिरे, रत्नें, माणिकें, मोत्यें हीं किती किमतीचीं गेलीं हें बरोबर समजलें नाहीं; परंतु असें सांगतात कीं, ह्या द्रव्यानें लहान लहान नऊ गलबतें गच्च भरलीं होतीं. तीं वाजतगाजत मोठ्या उत्साहानें कलकत्त्यास गेलीं. ह्या घडामोडींत खुद्द क्लैवसाहेबाला तीस लक्ष रुपये मिळाले.

मीर जाफर नवाब झाला तो क्लैवसाहेबाच्या अगदीं अध्याँ वचनांत राहूं लागला. क्लैवसाहेबाच्या योगानें इंग्लिशांचें वजन वाढत चाललें. इतक्यांत प्लासीच्या जयाची शुभवार्ता कळण्याच्या पूर्वींचे रवाना झालेले कंपनी सरकारचे हुकूम एकाएकीं येऊन धडकले. त्यांत बंगाल्यामध्यें मिळालेल्या प्रांतांवर जे अधिकारी नेमिले होते त्यांत क्लैवसाहेबाचें नांव नव्हतें. तरी त्याच्या शौर्याकडे व वजनाकडे लक्ष देऊन नवीन नेमलेल्या कामगारांनीं त्यासच आपल्या कामांत मुख्य केलें, आणि तें काम त्यानें त्यांच्या मर्जीप्रमाणें चांग-

लें वजाविलें. पुढें प्लासीच्या विजयाची बातमी विलायतेस पोंहोचून तिकडून क्लैवसाहेवाची नेमणूक बंगालच्या गव्हरनराच्या जाग्यावर होऊन आली.

क्लैबसाहेब आपलें नवीन हुद्याचें काम पाहूं लागल्यानंतर त्यानें फोर्दसाहेब नामक सरदारास बरोबर पुष्कळ सैन्य देऊन कर्नाटकांत फ्रेंच लोक प्रबळ होत चालले होते त्यांस तेथून हाकून देण्याकरितां मोठ्या तयारीनें पाठविलें. याप्रमाणें इंग्लिशांची फौज गुंतली गेली असें पाहून दिल्लीच्या पदच्युत व प्रतिबंधित बादशाहाच्या शाहाआलम नामक मुलानें मराठे, मुसलमान, जाट, अफगाण इत्यादि प्रकारचे एकंदर ४०,००० लोक जमवून बंड केलें. त्याच्या मनांत मीर जाफरास नाहींसें करून टाकून त्याचें राज्य काबीज करावयाचें होतें, हें मीर जाफरास समजलें तेव्हां तो अगदीं घाबरून गेला आणि त्यानें त्या शाहाजाद्यास त्याच्या म्हणण्याप्रमाणें पुष्कळ द्रव्य देऊन त्याचें अभयवचन घेतलें हें क्लैवसाहेबास नीट वाटलें नाहीं. तेव्हां त्यानें मीर जाफरास असें पत्र पाठविलें कीं, "जर तुम्हीं असा दुर्बलपणा कराल तर मराठे, अयोध्येचा नवाब वगैरे जे तुमच्या राज्याच्या हद्दीवर आहेत ते येऊन तुम्हांजवळचा सर्व पैसा याप्रमाणेंच घेऊन जातील आणि तुम्हांजवळ कांहीं एक राहणार नाहीं. तुम्ही आपल्या सैन्याच्या व आम्हां इंग्लिश लोकांच्या प्रामाणिकपणावर विश्वास ठेवून स्वस्थ राहावें, एवढेंच सांगणें आहे." त्याप्रमाणेंच पाटणाचा सुभेदार राम नारायण यालाही पत्र लिहिलें. त्यांत असें होतें कीं,

"तुम्ही तह करूं नका, शेवटपर्यंत आपल्या शहराचें रक्षण करा आणि खातरी ठेवा कीं, इंग्लिश लोक तुमचे जिवलग मित्र आहेत, व त्यांनीं ज्यास एकदा आपलेंसें म्हटलें त्यास ते कधींही अंतर द्यावयाचे नाहींत." ह्या सांगण्याप्रमाणें तो सुभेदार वागला. शहाआलमानें त्याच्या शहरास वेढा दिल्यावर त्यानें बराच वेळ नेट धरिला. इतक्यांत ४५० गोरे व २,००० काळे इतके लोक घेऊन क्लैवसाहेब त्याच्या साहाय्यास आला. हें वर्तमान ऐकतांच वेढा घालणाऱ्या लोकांस भय वाटून त्यांनीं एकदम पळ काढिला. अशा रीतीनें ४०,००० सैन्य दशदिशा फांकून गेलें. पाहा, जी फौज एतद्देशीय राजांस समरंगणीं दुर्जय वाटली, व जिला पाहतांच त्यांची पांचांवर धारण बसली ती केवळ इंग्लिशांचें सैन्य क्लैवसाहेबाबरोबर आलें असें समजल्याबरोबर भयभीत होऊन चोहोंकडे फांकली हा चमत्कार नव्हे काय?

हा जय झाल्यावर क्लैवसाहेब मोठ्या आनंदानें कलकत्त्यास गेला. शहाआलमाची दाणादाण झाली ती ऐकून मीर जाफरास मोठा संतोष झाला. त्यानें त्या कृत्याबद्दल क्लैवसाहेबाचे फार आभार मानिले आणि बंगाल्याच्या कांहीं प्रांताबद्दल कंपनी सरकाराकडून नवाबास दरसाल तीस हजार रुपये मिळत असत तें सर्व उत्पन्न त्यानें क्लैवसाहेबास इनाम म्हणून सोडलें.

नंतर मीर जाफरासही वेडे चाळे आठवले. त्यानें इंग्लिशांस हिंदुस्थानांतून हाकून लाविण्याच्या मदतीकरितां चिनसुरा येथील डच लोकांची मदत मागित-

ली. त्यांनीं लागलीच त्या कामासाठीं सात गलबतें आंत १,५०० लोक भरून बटेविया येथून रवाना केलीं. तीं हुगळी नदींत येऊन नांगरलीं, तेव्हां क्लैवसाहेबाजवळ लढाईची तयारी नव्हती. बहुतेक फौज करनाटकांत गेली होती. आलेल्या गलबतांस मीर जाफराचें अंग आहे; एकदम हल्ला करावा तर पूर्वीचा तह मोडण्यास आपणाकडून उपक्रम झालासें होतें; फ्रेंचांशीं लढाई चाललीच आहे, आणि डचांशीं समर मांडणें हें मुख्य सरकारास आवडणार नाहीं; इत्यादि गोष्टी प्रतिकूल असून डच ईस्तइंदिया कंपनीच्या मार्फत पुष्कळ पैसा आपण स्वदेशास पाठविला आहे, असे विचार मनांत येऊन त्यांजवर चालून जाण्याची इच्छा क्लैवसाहेबास होईना; परंतु विचारांतीं त्याच्या लक्षांत असें आलें कीं, आपण भितरेपणा करून ह्या वेळेस जर स्वस्थ बसलों तर डच आणि नबाब यांचें सैन्य एकत्र होऊन कदाचित् इंग्लिश लोकांस बंगाल्यांतून हाकून लावील तें बरें नव्हे. तेव्हां त्यानें तेवढेंच सैन्य घेऊन शत्रूंवर हल्ला केला आणि त्यांचा मोड करून टाकला. त्यांचे बहुतेक युरोपियन शिपाई ठार मारिले व त्यांचीं जहाजें घेतलीं. नंतर इंग्लिशांनीं चिनसुऱ्यापुढें तळ देऊन तेथच्या डच अधिकाऱ्यांपासून लागतील तसे करार करून घेतले. वखारींच्या रखवालीस वगैरे जे लोक लागतील त्यांपेक्षां अधिक शिपाई आम्ही ठेवणार नाहीं आणि ठेविल्याचें शाबीत झाल्यास आम्हांस बंगाल्यांतून एकदम

हाकून लावावें असाही एक करार क्लैवसाहेबानें त्याज-
कडून कबूल करविला.

यानंतर तीन महिन्यांनीं क्लैवसाहेब पुनः स्वदेशीं गेला तेथें त्याचा चांगला आदरसत्कार झाला, तिसरा जार्ज राजा नुकताच सिंहासनारूढ झाला होता त्यानें त्याची फार प्रशंसा केली, वडेलोकांत त्याची गणना होऊं लागली व त्याला एक पदवीही प्राप्त झाली. पिटसाहेब सरकारचा मुख्य प्रधान होता त्यानें पार्लमेंतसभेंत त्याच्या शौर्याची अशी तारीफ केली कीं, तेणेंकरून त्याचें नांव सर्व देशभर गाजूं लागलें.

या खेपेस क्लैवसाहेबाची संपत्ति फार मोठी होती, त्यानें फक्त डच इस्तइंदिया कंपनीच्या मार्फत १८,००,००० अठरा लक्ष रुपये स्वदेशास पाठविले होते; शिवाय ४,००,००० रुपये इंग्लिशांचे हातीं रवाना केले होते. त्यानें केवळ मद्रास येथें असतां २,५०,००० अडीच लक्ष रुपयांचें जवाहीर खरेदी केलें होतें; २,७०,००० रुपये त्याला त्याच्या हिंदुस्थानांतल्या उत्पन्नाचे दरसाल येत होते. क्लैवसाहेबाचें वर्षाचें उत्पन्न मालकमसाहेबानें भीत भीत आपल्या कडून अगदीं बेतानें सांगितलें आहे तरी तें ४,००,००० हून पुष्कळ जास्त आहे. हें त्याच्या संपत्तीचें केवळ स्थूल मान आहे!!

क्लैवसाहेबानें आपल्या द्रव्याचा फार चांगला उपयोग केला. प्लासीची लढाई झाल्याबरोबर एक लाख रुपये आपल्या वहिणीस पाठविले, पुढें थोडक्याच

दिवसांनीं २ लक्ष रुपये त्यानें आपल्या मित्रांस व आप्तवर्गांस पोंचविले, दरसाल आठ हजार रुपयांची नेमणूक आपल्या मातापितरांस करून दिली आणि आपला जुना मुख्य अधिकारी व हितकर्ता लॉरेन्स-साहेब याचे उपकार स्मरून व त्याचें उत्पन्न त्यास पुरत नाहीं असें पाहून, त्याला दरसाल ५,००० रुप-यांची नेमणूक ठरविली. हा व याशिवाय अशा कृत्यांकडे जो त्याचा खर्च होत असे तो मिळून एकं-दर ५०,००० पन्नास हजार रुपयांची भरती होते. या भरभराटींत क्लैवसाहेब ३४ वर्षांचा होता.

क्लैवसाहेबानें पुष्कळ पैसा खर्चून जमीन विकत घेतली (१७६१). नंतर त्याला त्याच्या इच्छेप्रमाणें पार्लमेंत सभेंत जागा मिळाली. तेथें तरी त्याचें लक्ष स्वदेशाच्या राज्यव्यवस्थेकडे नव्हतें; हिंदुस्थानाकडे होतें, तेव्हां हिंदुस्थानाचा राज्यकारभार पाहण्याच्या मंडळींत सुलेव्हन म्हणून कोणीएक हुशार व महत्वा कांक्षी गृहस्थ होता, त्याचें व क्लैवसाहेबाचें बहुत दिवसांपासून वांकडें पडलें होतें. त्याचें नुकसान करण्याविषयीं क्लैवसाहेबानें होते तितके यत्न केले ते सर्व व्यर्थ गेले; परंतु त्याचा सूड उगविण्यासाठीं सुलेव्हनसाहेबानें खटपट केली तींत शाहाआलमाच्या गडबडीमध्यें जें उत्पन्न मीर जाफरानें इनाम दिलें म्हणून वर लिहिलें आहे तें क्लैवसाहेबास कंपनी सर-काराकडे द्यावें लागलें.

क्लैवसाहेब विलायतेंत पांच वर्षें राहिला, तितक्या अवकाशांत बंगाल्यांत फार अव्यवस्था होऊन गेली.

इंग्लिशांनीं मीर जाफरास पदच्युत करून मीर कासिमास गादीवर बसविलें, तोही त्यांच्याशीं कपट करूं लागला. म्हणून इंग्लिशांनीं मीर जाफरास पुनः नबाब केलें. त्यांनीं व्यापारांत हात घालून आपल्या पिशव्या भरल्या आणि लोक भिकेस लावले. इंग्लिश लोक रयतेवर इतका जुलूम करूं लागले कीं, साहेबांची पालखी गांवाकडे येत आहे अशी बातमी ऐकिल्याबरोबर लोकांनीं घरदाराची आस्था सोडून आपापले जीव घेऊन रानांत पळावें आणि गांव ओस पडावा असें चाललें होतें. लष्करांत शिपाईलोक आपल्या अधिकाऱ्यांचे हुकूम मानीनात, न्याय नाहीं, बंदोबस्त नाहीं, वळी तो कान पिळी अशी देशाची अवस्था झाली, ती सगळी विलायतेस कळली तेव्हां ह्या गडबडीचा वंदोबस्त क्लैवसाहेबावांचून दुसरा कोणी करूं शकणार नाहीं असा विचार मनांत आणून आणि त्याजवर आलेला आरोप दृष्टीआड टाकून त्यास पुनः हिंदुस्थानांत जाण्याविषयीं दायरेक्तर लोकांनीं विनयपूर्वक सूचना केली त्या प्रसंगीं तो असें बोलला कीं, मजजवळ एवढी संपत्ति कशी जमली याचा तुम्हांस मोठा अचंबा वाटतो व संशयही येतो; परंतु तिचा बरोबर सूड लागण्याजोगा पुरावा मी तुम्हांपुढें लवकरच हजर करीन म्हणजे मग तुमची वालंवाल खात्री होईल, ती गोष्ट असो; पण माझा शत्रु सुलेव्हनसाहेब जोंपर्यंत तुमच्या कंपनीच्या कारभारांत आहे तोंपर्यंत बंगाल्याच्या व्यवस्थेचें काम मी हातीं धरणार नाहीं. नंतर मोठ्या मिनतवारीनें त्यानें बंगालच्या मुख्य

सेनापतीचें व गव्हर्नराचें काम पतकरीलें. आणि सुलेव्हनसाहेबानेंही त्याशीं मोठ्या नम्रतेनें स्नेह जोडिला.

असें झाल्यावर क्लैवसाहेब विलायतेहून निघून इ. स. १७६५च्या मे महिन्यांत कलकत्त्यास पोंचला. त्यापूर्वींच मीर जाफर व त्याचा मुलगा मीरल हे मरण पावले होते व त्या वेळच्या वहिवाटीप्रमाणें १४,००,००० चवदा लक्ष रुपये घेऊन इंग्लिशांनीं माजी नबाबाच्या धाकट्या मुलास गादीवर बसविलें होतें आणि ती रकम नऊ मुख्य साहेबलोकांनीं आपसांत वांटून घेतली होती. हें वर्तमान त्यास विदित झालें. तेव्हां लोकांची दुर्दशा पाहून व स्वदेशबांधवांची जुलमी वागणूक मनांत आणून त्यानें मोठा खेद केला. त्या संधीस त्यानें आपल्या एका मित्रास पत्र लिहिलें. त्यांत तो म्हणतो कीं, "हर हर ! इंग्लिशांचें नांव कसें तरी बुडालें हें ! ब्रितिशलोकांची एवढी मोठी कीर्ति आतां इतकी नष्ट झाली आहे कीं, ती पूर्व-स्थितीस येईल अशी कांहीं आशा नाहीं हें मनांत आल्यावर नेत्रांतून अश्रुधारा आल्यावांचून राहात नाहींत, तथापि मरणोत्तर ज्यापाशीं आपणांस पापा-पुण्याचा हिशोब द्यावयाचा आहे, अशा सर्वांतरसाक्षी परमेश्वरास स्मरून मी सांगतों कीं, मागें झालेली व हल्लीं वाढत चाललेली अव्यवस्था समूळ नाहींशी करण्याचा हेतु मनांत धरून मी येथें आलों आहें आणि हें इष्टकार्य सिद्धीस नेण्याच्या यत्नीं जीव गेला तरी बेहत्तर, असा माझा निश्चय झाला आहे."

त्यानें आल्याबरोबर व्यवस्थेस आरंभ केला. काम-

गार लोकांनीं खासगी व्यापार करूं नये व नजराणे घेऊं नयेत, असा ठराव केला. तो बहुत कामगारांस आवडला नाहीं, म्हणून ते तो रद्द करण्याची खटपट करूं लागले, तेव्हां क्लैवसाहेबानें त्यांस निक्षून असें सांगितलें कीं, या नियमाप्रमाणें चालण्याची मर्जी नसेल तर तुमची आम्हांस गरज नाहीं; आम्हीं मद्रासेहून लोक आणून काम चालवूं. हें कानीं पडल्याबरोबर सर्वांचीं तोंडें बंद झालीं. इतक्यांत लष्करी लोकांच्या भत्त्याच्या कायद्यांत कांहीं फेरफार केल्यामुळें त्यांच्यातही असाच बखेडा होऊन, २०० असामी एकदम राजीनामे देऊं लागले, तरी तो भ्याला नाहीं. त्यानें कांहीं लोक पाठवून देण्याविषयीं मद्रासेकडे लिहिलें आणि लष्करांत ज्या थोड्याशा जागा रिकाम्या पडल्या होत्या त्यांजवर व्यापारासाठीं इकडे आलेल्या लोकांस नेमून काम चालविलें. तेव्हां तीही गडबड मोडली.

सदरीं लिहिलेल्या लष्करी कटाची चौकशी चालली असतां, एका इंग्लिश शिपायावर क्लैवसाहेबास ठार मारण्याच्या बेताची शाबिदी झाली, तरी त्यानें त्याचें कांहीं विशेष मनांत आणिलें नाहीं आणि तो म्हणाला, "हे इंग्लिश कामगार आहेत, मारेकरी नाहींत."

खासगी व्यापार व नजराणे यांची बंदी झाली सबब इंग्लिश कामगारांस त्यांच्या पगारांवर निर्वाह करणं कठीण, असें मनांत आणून मिठाचें वगैरे उत्पन्न वाढवून त्याचा पैसा त्यांच्या पगारांकडे यथाविभाग

वांटून दिला, तेणेंकरून त्यांची चांगली सोय झाली.

अशी व्यवस्था इकडे चालली आहे इतक्यांत तिकडे बहार प्रांताच्या सरहद्दीवर अयोध्येचा नवाब मराठे व अफगाण यांच्या फौजांस आपल्या फौजेंत मिळवून तळ देऊन राहिला होता; परंतु क्लैवसाहेब हिंदुस्थानांत पुनः आला अशी बातमी त्यास समजतांच त्यानें लोकांच्या फौजा परत पाठवून आपल्या राजधानीची वाट धरिली आणि क्लैवसाहेबानें सर्व गोष्टी आपल्या म्हणण्याप्रमाणें त्याजपासून कबूल करून घेतल्या.

बहुतेक बंगाल प्रांत जरी इंग्लिशांच्या ताब्यांत आहे तरी तो त्यांस कसा मिळाला व त्याचा राज्यकारभार चालविण्यास त्यांस कोणी अधिकार दिला याविषयीं कायदेशीर व दहांत दाखविण्याजोगा असा कांहीं दाखला आपणापाशीं असावा असें क्लैवसाहेबाच्या मनांत आलें, त्यावरून त्यानें तशा प्रकारची एक सनद आपणास मिळण्याविषयीं दिल्लीच्या नामधारी बादशाहास विनंती केली. ती मान्य करण्यास तो प्रथमतः कांहीं मागेंपुढें पाहूं लागला; परंतु ज्या इंग्लिशांपासून आपणास छदामही प्राप्त व्हावयाचा नाहीं त्यांजकडून या निमित्तानें तरी कांहीं रुपये आपणास मिळतील व जो प्रदेश हल्लीं अगदीं त्यांच्या ताब्यांत आहे त्याचीच ते सनद करून मागतात, तर हा बिनखर्ची नफा व सन्मान आपण कां करून घेऊं नये? असा विचार मनांत आणून बंगाल, बहार आणि ओरिसा, या तिहींची वसूलजमाबंदी व संपूर्ण राज्य-

कारभार पाहण्याविषयीं त्यानें कंपनीच्या नांवानें सनद करून दिली, हें क्लैवसाहेबानें एक मोठेंच काम केलें.

माटाच्या अधिकाऱ्यांवर जुलूम न करतां देखील क्लैवसाहेबानें या खेपेस पुष्कळ द्रव्य मिळविलें असतें; परंतु अशा गोष्टींकडे त्यानें त्या वेळीं लक्ष दिलें नाहीं. काशीचा राजा व अयोध्येचा नबाब यांनीं जवाहिरांनीं पेट्या भरभरून त्याजकडे पाठविल्या; परंतु त्या त्यानें त्यांस परत दिल्या, ही गोष्ट त्यानें कीर्त्यर्थ केली असें म्हणतां येत नाहीं. कारण ती तो मरण पावल्यानंतर पुष्कळ दिवसांनीं लोकांस समजली. तेथपावेतों ती कोणास ठाऊक नव्हती. या खेपेस त्याच्या पिशवीस भर तर पडली नाहींच; परंतु उलटी खळगी पडली यांत कांहीं संशय नाहीं.

मीर जाफरानें मरतेवेळीं क्लैवसाहेबाकरितां रोकड व जवाहीर मिळून एकंदर सुमारें सहा लक्षांहूनही अधिक ऐवज ठेविला होता, तो घेण्यास आपणाला कांहीं हरकत नाहीं. कारण नजराणा न देण्याघेण्याचा ठराव जीवंत माणसांस मात्र लागू आहे, मेलेल्यांस नाहीं. मीर जाफर मरून गेलेला आहे व ही रकम सदरील कायदा ठरण्यापूर्वींच दत्त झालेली आहे असा विचार करून तो पैसा क्लैवसाहेबानें प्रथमतः स्वीकारिला; परंतु तो पुढें आपल्या खुषीनें चाकरी करतां करतां थकलेल्या लोकांच्या कामीं लावावा म्हणून कंपनी सरकाराकडे दिला.

याप्रमाणें बंगाल्यांत पुनः जिकडे तिकडे बंदोबस्त करून व सरकारी सर्व काम सरळ मार्गास लावून

क्लैवसाहेब इ० स० १७६७ च्या जानेवारी महिन्यांत विलायतेस निघून गेला. येथेंच त्याच्या हिंदुस्थानांतील कारकीर्दीचा शेवट झाला.

क्लैवसाहेब विलायतेस जाऊन पोहोंचतांच त्याच्या शत्रूंनीं त्याचा छळ मांडिला. मागच्या खेपेस बाचाबाच होऊन जे प्रतिस्पर्धी कांहीं कारणानें उगीच बसले होते त्यांनीं हा संधि साधला. क्लैवसाहेबाच्या कामांत हात घालण्यास ज्यांस जागा नव्हती त्यांनीं आपली मालमत्ता विकून ईस्त इंदिया कंपनींत भाग विकत घेतले, आणि क्लैवसाहेबाचे दोष काढण्याचा व त्याची छळना करण्याचा अधिकार मुद्दाम आपणाकडे आणिला. त्यांनीं त्याच्या माठाच्या सर्व कृत्यांची चौकशी चालविली. प्रथमतः अगदीं यःकश्चित् कुलांतले असून अन्यायानें हिंदुस्थानांतलें द्रव्य ओरपून क्लैवसाहेबासारखे कांहीं लोक गबर झाले होते त्यांस 'नबाब' असें थट्टेचें नांव लोकांत पडलें. ते बहुतकरून गर्विष्ठ, डौली व दांडगे असत म्हणून ते इतर सर्व लोकांच्या डोळ्यांत खुपत होते. त्यांत क्लैवसाहेबास तर लोक फारच वाईट मानूं लागले होते.

इकडे इ० स० १७७० त बंगाल्यामध्यें मोठा दुष्काळ पडला, नद्यांचें पाणी आटलें, विहिरी कोरड्या पडल्या, सर्व लोक उपाशीं मरूं लागले. गरीब गुरीबांची गोष्ट असो; परंतु ज्यांच्या सुंदर कोमल शरीरांस सूर्यकिरणाचा ताप कधीं ठाऊक नव्हता, अशा नाजुक स्त्रियांचीं व बालकांचीं प्रेतें रस्त्यांत पडलीं व नद्यांतून वाहत गेलीं. अशीं माणसें रोज

किती मरत याची गणती बरोबर सांगतां येत नाहीं, तथापि त्यांची मोजणी शेंकड्यावर नसे, तर हजारांवर असे हें खचित आहे. ही अनर्थाची वार्ता विलायतेस समजली तेव्हां तेथील लोकांस फार वाईट वाटलें, आणि असा प्रकार होण्यास बंगाल्यांतील इंग्लिश कामदार कारणीभूत आहेत असें त्यांच्या मनांत पक्कें ठसलें. तेणेंकरून तर क्लैवसाहेबाच्या करणीविषयीं लोकांस अधिक संशय उत्पन्न झाला. वास्तविक पाहिलें असतां सदरीं लिहिलेल्या अनर्थास केवळ इंग्लिश कामगारांचा अधाशीपणाच कारण होता असें नाहीं. त्या वर्षीं पाऊस मुळींच पडला नाहीं, त्याला ते काय करतील? असो.

इतका गवगवा झाला तरी पार्लमेंत सभेनें हिंदुस्थानाच्या राज्यव्यवस्थेकडे लक्ष दिलें नाहीं; परंतु पैसा नाहीं व उत्पन्नही पुरत नाहीं इत्यादि गोष्टींची रड त्या संधीस ईस्तइंदिया कंपनीच्या कामदारांकडून येऊं लागली, तेव्हां तिला त्याजकडे लक्ष पुरविणें भाग पडलें. इंदिया हौस, पार्लमेंत सभा, इतर सरकारी कचेऱ्या व लोक यांजमध्यें क्लैवसाहेबाचा द्वेष बऱ्याच दिवसांपासून होऊं लागला होता म्हणून हिंदुस्थानांतील राज्यव्यवस्थेची चौकशी प्रथमतः त्याजवरच कडाडली. त्यावेळीं त्यास कोणी मोठा साह्य करणारा नव्हता. ग्रानाव्हिल मरून गेला होता व त्याच्या जुटीच्या मंडळीची वाताहात झाली होती. त्याजवरील दोषांच्या पुराव्याचा खूप भडिमार करून त्याला पार्लमेंत सभेंतून हाकून लावावें, त्याची सगळी

दौलत लुटावी आणि जनांत त्याची छीः थू, करावी अशी त्याच्या वैऱ्यांची इच्छा होती.

चौकशी सुरू झाली तेव्हां आपल्या साहसी स्वभावाप्रमाणें क्लैवसाहेबानें आपणावर आलेल्या आरोपांच्या निवृत्त्यर्थ एकसारखें संगतवार आणि सयुक्तिक असें भाषण केलें. तेव्हां सर्व सभा चकित झाली आणि शेवटच्या खेपेचीं आपलीं कृत्यें अगदीं निर्दोष आहेत असें त्यानें सर्वांच्या मनांत भरवून दिलें; तेव्हां त्याच्या प्रतिपक्षांची हिंमत कांहींशी कमी झाली. म्हणून त्यांनीं त्याच्या पहिल्या व दुसऱ्या खेपांच्या वर्तणुकीचा विचार चालविला. त्यांत सुराजउद्दवला उमीचंद, मीर जाफर इत्यादिकांच्या गोष्टींवरून त्याजवर पुष्कळ दोष शाबीत झाले, आणि त्या प्रसंगीं त्याची फारच मानखंडना व निर्भर्त्सना झाली, तेव्हां त्यास परम दुःख वाटलें. तथापि तो स्पष्टवक्ता धीराचा पुरुष त्यावेळीं उघडपणें असें बोलला कीं, उमीचंदास फसविल्याची गोष्ट कबूल करण्यास मला अगदीं देखील लाज वाटत नाहीं, आणि तसा अणीबाणीचा प्रसंग तशा लबाड मनुष्याशीं पुन्हा पडल्यास तसेंच कपटाचें आचरण करण्यास मी कधींही टळणार नाहीं मीर जाफरानें मला पुष्कळ द्रव्य दिलें आणि मी तें घेतलें हें मला कबूल आहे तरी त्यांत माझ्या हातून मोठेंसें दुष्कर्म घडलें असें मला वाटत नाहीं. आणखी त्यानें असें बोलून दाखविलें कीं, एवढा सधन देश माझ्या मुठींत असून मी कायतो एवढाच पैसा जमविला या माझ्या मितलो-

भोपणांचें मला खरोखर आतां मोठें आश्चर्य वाटतें.

क्लैवसाहेबाची चौकशी पुनः दुसऱ्यावेळीं चालू झाली तेव्हां पुष्कळ वादविवाद होऊन, शेवटीं कामन्स सभेनें असें ठरविलें कीं, क्लैवसाहेबाच्या हातून जरी मोठमोठे दोष घडले, तरी त्यानें सरकारास मोटा फायदा करून दिला, म्हणून त्यास सन्मान देणेंच योग्य आहे. हा ठराव होण्यापूर्वींच त्याला 'नाइट आफ् बाथ' म्हणून जी पदवी मिळाली होती तिचा मोटा प्रसिद्ध समारंभ झाला, व श्रापशायराचा लार्ड लेफ्तनंतही त्यास नेमिलें.

अशी थावराथावर झाल्यावर क्लैवसाहेबास कांहीं समाधान वाटलें. देशांत प्रथमतः गवगवा झाला तेव्हां त्यानें त्यांस फारशी दाद दिली नाहीं. तो तेव्हां हिंदुस्थानांतल्यापेक्षांही मोठ्या डौलानें व मिजाजीनें राहात असे; परंतु पहिलीं दुःखें, कपटें, लढाया, त्यांचे परिणाम, दोष, अपवाद, चौकशी, अप्रतिष्ठा इत्यादिकांच्या कसाल्याखालीं त्याचें मन अगदीं थकून व कंटाळून गेलें होतें. शेवटीं त्याला चैन पडेनासें झालें म्हणून तो जास्त अफू खाऊं लागला. मग तिचें त्याला फार व्यसनच जडलें. त्या अमलांत तो गुंग असतां एकाएकींच मोठ्या राज्यप्रकरणाच्या गोष्टी काढाव्या, आणि लहर गेली म्हणजे मग उगाच भ्रमिष्टासारखें स्तब्ध बसावें, अशी त्याची अवस्था झाली. परिणामीं ता. २२ नोवेंबर इ० स० १७७४ रोजीं त्या पुरुषानें आत्महत्या करून घेतली. याप्रमाणें

क्लैवसाहेबाचा अंत झाला. त्यावेळीं तो ४९ वर्षांचा होता.

क्लैवसाहेबाच्या हातून पुष्कळ कृत्यें घडलीं. त्यांत जीं सत्परिणाम झालीं त्यांची इतरांशीं तुलना करून पाहिली तर एकंदरीनें त्या पुरुषास उत्तम पुरुषांच्या माळेंत घालण्यास कांहीं हरकत नाहीं असें बहुत ग्रंथकारांचें मत आहे. तो प्रथमतः हिंदुस्थानांत आला तेव्हांपासून इंग्लिशांस जयप्राप्ति होऊं लागली; दुसऱ्या खेपेस मुलूख काबीज करून त्यानें राज्य स्थापिलें, आणि तिसऱ्या खेपेस राज्यव्यवस्था केली. तो सुरूप नव्हता; परंतु त्याचा आंगलोट चांगला असून त्याचे टायीं तेज फार दिसत असे. त्याचीं बहुतेक कृत्यें मागें वर्णिलीं आहेत त्यांवरून त्याचा स्वभाव कोणत्या प्रकारचा होता हें सहज लक्षांत येईल. म्हणून त्याविषयीं येथें निराळें लिहिणें नको.

---

## वारन हेस्तिंग.

ह्या पुरुषाचें जन्म इ० स० १७३२ च्या दिसेंबर महिन्याच्या ६ व्या तारखेस झालें. नंतर थोडक्याच दिवसांनीं त्याची आई मरण पावल्यामुळें त्याचा सांभाळ त्याच्या बिचाऱ्या वृद्ध गरीब आजास करावा लागला. त्यानें त्याला चालतां बोलतां येऊं लागतांच एका लहानशा गांवठी शाळेंत घातलें. तेथें त्यानें लिहिण्यावाचण्याचा थोडाबहुत अभ्यास केला.

तो सात आठ वर्षांचा झाला तेव्हां त्याच्या पूर्वजांची सर्व कथा त्यास समजली. त्यांची वढती,

राजनिष्ठा, आणि त्यांची मानमान्यता हीं जेव्हां त्यानें ऐकिलीं तेव्हां त्यास त्याच्या स्वतःच्या स्थितीच्या विचारानें फार दुःख झालें आणि माझ्या एवढ्या योग्य वाडवाडिलांचा मूळचा प्रदेश जो देल्सफोर्द त्यांत मी आपलें नांव त्यांच्या प्रमाणेंच एकवेळ गाजवीन असा त्यानें निश्चय केला.

हेस्टिंग आठ वर्षांचा झाल्यावर त्यास त्याच्या मामानें लंडनास नेलें. तेथें तो नाटिंगहामच्या शाळेंत जाऊं लागला. त्या ठिकाणीं त्याच्या अभ्यासाची सोय चांगली होती; परंतु खाणेंपिणें, वस्त्रप्रावरण इत्यादि गोष्टींविषयीं जे हाल त्यास भोगावे लागले ते लिहितां पुरवत नाहींत. दहा वर्षांचा झाल्यावर तो वेस्तमिनिस्तर शाळेंत गेला. तींत त्याचा चांगला विद्याभ्यास झाला, आणि पुढें लागलीच जी परीक्षा झाली तींत तो इतरांपेक्षां उत्तम ठरला.

इतक्या गोष्टी घडल्या तों हेस्टिंगास चवदावें वर्ष लागलें आणि पुढें थोड्याच दिवसांनीं त्याचा मामा मरण पावला. त्यानें मरतेसमयीं हेस्टिंगास चिसविक नामक एका आप्त मनुष्याच्या स्वाधीन केलें. त्यानें त्याचें कांहीं दिवसपर्यंत चांगल्या रीतीनें पालनपोषण केलें; परंतु पुढें त्याला त्याचें मोठें ओझें वाटूं लागलें. शाळेमध्यें दिवस गेले ते बस झाले. आतां कांहीं तरी पोटाचा उद्योग पाहा अशी त्यानें हेस्टिंगाच्या मागें एकसारखी टोचणी लाविली. हें त्याच्या गुरूस समजलें तेव्हां त्यानें चिसविकास सांगितलें कीं, तुम्हीं उगीच घाई करूं नका. हेस्टिंगाची बुद्धि चांगली आहे, त्याला

आणखी कांहीं दिवस शाळेंत राहून अभ्यास करूं द्या, म्हणजे तो पुढें खचीत चांगलें नशीब काढील. तरी त्या हट्टी मनुष्यानें त्या विद्वान् हितवादी पुरुषाचें कांहीं ऐकिलें नाहीं. शेवटीं त्यानें त्या मुलास ईस्तइंदिया कंपनीच्या शाळेंत पाठवून, थोडक्याच दिवसांमध्यें हिशोब व जमाखर्च यांत तर्बेज करून इ० स० १७५० च्या अखेलीस जहाजांतून हिंदुस्थानाकडे लावून दिलें त्यावेळीं तो १७ वर्षांचा होता.

तो आक्टोबर महिन्यात बंगाल्यास पोहोंचला, आणि त्याला तेथें लागलीच कारकुनीची जागा मिळाली. ती सरकारी कामाची नव्हती तर व्यापारांतली होती; कारण त्या संधीस कर्नाटकामध्यें फ्रेंच, इंग्लिश, आणि नबाब यांची धामधूम चालून तेथें इंग्लिशांच्या राज्याधिकाराचें निशाण मोठ्या डौलानें फडकत होतें, तरी बंगाल्यांत अगदीं स्वस्थता असून तेथील इंग्लिश. रहिवासी व्यापाराच्या कामांत मग्न होते.

हें कारकुनीचें काम दोन वर्षेंपर्यंत केल्यावर मुर्शिदाबादेजवळ काशिबाजार म्हणून एक गांव आहे तेथचा व्यापार संभाळण्याच्या कामावर त्याची नेमणूक झाली. तेथें त्यानें मोठ्या हुशारीनें व मेहनतीनें आपलें काम चालविलें आहे इतक्यांत बंगाला, बाहार आणि ओरिसा या प्रांतांच्या सुराजउद्दवला नामक महाजुलमी नवाबानें इंग्लिशांशीं वैर बांधून, त्यांचा व्यापार अगदीं नष्ट करून टाकावा या बुद्धीनें काशिबाजारावर स्वारी केली, आणि हेस्तिंगास कैद करून मुर्शिदाबादेस पाठविलें; परंतु तेथें त्यानें त्याला फार

दिवस अडकवून न ठेवितां दच लोकांच्या सांगण्यावरून लौकरच सोडून दिलें.

इकडे कलकत्त्यावर नबाबाची धाड पडून तेथील गव्हर्नर वगैरे सर्व बडेबडे इंग्लिश लोक, हुगळी नदीमध्यें फल्दा म्हणून जें एक बेट आहे त्याजवर पळून जाऊन राहिले होते. त्यांस आपल्या विषयीं नबाबाच्या दरबारांत काय काय मसलती चालल्या आहेत त्या जाणण्याविषयीं फार उत्कंठा झाली. इतक्यांत हेस्तिंग तिकडून सुटून आला त्यानें त्यांस जें पाहिजे तें सर्व कच्चें वर्तमान सांगितलें, आणि त्या दरबारचे सर्व बेत आपणांस अनायासें कळतील असें तिकडचें वळण बांधिलें. या गोष्टीच्या योगानें त्याचें वजन इतकें वाढलें कीं, नबाबास पदच्युत करण्याचा मोठा बेत जो फार गुप्तपणें चालला होता त्यांत त्याची सल्ला मसलत घेऊं लागले.

कलकत्त्यावरच्या स्वारीच्या गडबडींत क्लैवसाहेबाचें शौर्य व ऐश्वर्य पाहून हेस्तिंग साहेबाचे बाहु फुरफुरले, आणि लढाईस आरंभ झाला तेव्हां तो यः कश्चित् शिपाई होता; परंतु त्याची चलाखी, हुशारी आणि समयसूचकता हीं क्लैवसाहेबाच्या नजरेस आल्यावरून त्यानें त्यास लढाई संपल्यावर लागलेंच मीर जाफराच्या दरबारीं इंग्लिशांच्या तर्फे वकील नेमिलें.

त्या कामावर तो इ० स० १७६१ पर्यंत राहिला; परंतु त्याच वर्षीं त्याला कौन्सलदारीची जागा मिळाल्यामुळें तो मुर्शिदाबादेहून निघून कलकत्त्यास जाऊन राहिला, तेव्हां क्लैवसाहेब स्वदेशीं गेला होता.

व्हान्सितार्त साहेब गव्हर्नर होता. प्रजेची स्थिति अगदीं वाईट होती, एतद्देशीय श्रीमान् व वजनदार लोक गरीबगुरीबांच्या माना मुरगळून त्यांच्या द्रव्यावर स्वस्थ ऐषआराम भोगीत, कितीएक इंग्लिश कामगारही त्याप्रमाणेंच जुलूम करून आपली पिशवी भरीत. काळे लोक व गोरे लोक यांच्या कटकटी झाल्या म्हणजे त्यांत न्यायान्याय एकीकडे राहून काळयांच्या कपाळीं अपयश येऊन त्यांस नशियत भोगावी लागे. इतकी घांशीरामी चालली होती तरी त्या प्रसंगीं हेस्तिंग साहेबाच्या हातून जुलूम किंवा लांच यांपैकीं कांहीं एक दुष्कर्म घडलें नाहीं, यास दोन प्रमाणें आहेत. त्याजवळ फार पैसा नव्हता हें एक, आणि त्याच्या कारकीर्दीच्या अंतीं त्याच्या दुसमानांनीं त्याच्या सर्व कृत्यांबद्दल सरकाराकडून त्याची फार बारकाईनें कडक चौकशी करविली, तेव्हां या वेळेचा कांहींच उल्लेख निघाला नाहीं हें दुसरें. तो नुसता कौन्सिलदार होता म्हणून लोकांचा सांभाळ करणें जरी साक्षात त्याच्या हातीं नव्हतें, तरी तो आपल्या इतर देशबांधवांसारखा निर्दयपणा करिता तर मोठा श्रीमान् झाला असता यांत अगदीं संशय नाहीं.

इ० स० १७६४ त हेस्तिंग साहेब स्वदेशीं गेला, तेव्हां त्यानें हिंदुस्थानांत कमाविलेलें सगळें द्रव्य बरोबर नेलें नाहीं. वाटखर्चास पुरून थोडा बहुत शिलक राही इतका मात्र घेऊन बाकी सर्व पैसा पुष्कळ व्याजाच्या लोभानें या देशांतच त्यानें ठेविला; परंतु कूळ सावकाराच्या म्हणण्याप्रमाणें व्याज देण्यास कबूल

झालें म्हणजे तीच मुदलास बोळ बसण्याची निशाणी अशी सावकारींत म्हण आहे. तिजप्रमाणें याच्या पैशाची वाट झाली म्हणजे त्याच्या एवढ्या ठेवीपैकीं एक कवडी दखील त्याच्या हातीं परत आली नाहीं.

तो स्वदेशीं सुमारें चार वर्षेंपर्यंत राहिला. त्या मुदतींतलें त्याचें वर्तमान आम्हांस फारसें माहीत नाहीं; परंतु इंग्लिश कोशाचा आदिकर्त्ता प्रख्यात विद्वान् डाक्तर जान्सन याचा व त्याचा फार स्नेह जमला हीच काय ती त्या वेळेची विशेष गोष्ट प्रसिद्ध आहे.

पैसा बरोबर नेला होता तो आप्तवर्गाचें दुःख निवारण्यांत व खाण्यापिण्यांत खर्चून गेल्यावर आपण कांहीं उद्योगासाठीं हिंदुस्थानांत जावें, असें हेस्तिंग साहेबाच्या मनांत आलें. म्हणून त्यानें आपल्या पूर्वीच्या यजमानाची ( कंपनीची ) प्रार्थना केली. त्यांनीं त्याची विद्वत्ता व बुद्धिचातुर्य इत्यादि गुण पाहून त्याला मद्रासच्या कौन्सिलदारीची जागा दिली. ह्या नव्या कामावर रुजू होण्याकरितां तो इ० स० १७६९ त इकडे यावयास निघाला. त्याच जहाजांतून इमहाफ या नांवाचा कोणी जर्मन मनुष्य चितान्याच्या धंद्यावर हिंदुस्थानांत पोट भरण्याच्या उद्देशानें आपल्या स्त्रीसहवर्तमान इकडे येत होता. ती स्त्री मोठी रूपवती, गुणवती आणि बुद्धिमती असून तारुण्याच्या भरांत आली होती. तिचें आणि तिच्या नवऱ्याचें जमत नसे. तिला त्याचा अगदीं कंटाळा आला होता. अशा अवस्थेंत असतां हेस्तिंग साहेबाचें आ-

चरण, त्याचा डौल, त्याचें वैभव, त्याच्या नशीबाची भरभर आणि त्याच्या ज्वानीचा भर इत्यादि गोष्टींनीं त्या तरुणीचें मन त्याजकडे लागत चाललें. त्यालाही ती आवडूं लागली. इतक्यांत हेस्तिंग साहेब दुखण्यांत पडला. मग तर त्याची प्रीति ओढून घेण्यास तिला फारच उत्कृष्ट संधि सांपडला. तिनें त्याचें औषधपाणी व जेवणखाण यांची इतकी टापटीप राखिली कीं, तिच्या योगानें ती त्याची अगदीं जीवलग होऊन गेली. शेवटीं असें झालें कीं, तिजपासून एक पळभर देखील त्याच्यानें दूर राहवेना. तीं सगळीं मद्रासेस पोहोंचल्यावर हेस्तिंग साहेबाशीं लग्न लावण्यास मोकळीक मिळावी म्हणून आपला आणि नवऱ्याचा घटस्फोट करून टाकण्याविषयीं त्या तरुण स्त्रीनें फिर्याद केली. तिजविषयीं पुष्कळ वादविवाद होऊन शेवटीं असें टरलें कीं, तिचा फ्रांकोनियाच्या कोर्तांत जो निकाल होईल, त्याप्रमाणें त्या उभयतांनीं वागावें; आणि हा निकाल कळे तोंपर्यंत त्या उभयतांनीं हेस्तिंग साहेबाजवळच असावें.

मद्रासेस आल्यावर हेस्तिंग साहेबानें थोडक्याच दिवसांत आपल्या यजमानाच्या मर्जीप्रमाणें राज्यव्यवस्था केली. तिच्या योगानें त्यांस पुष्कळ नफा होऊं लागला; तेव्हां हेस्तिंग खरोखरच मोठा हुशार, बुद्धिमान आणि व्यवस्थापक आहे, असें डैरेक्टर लोकांच्या मनांत येऊन त्यांनीं त्याला बंगालच्या गव्हर्नराची जागा दिली. तो ह्या नवीन कामावर रुजू होण्याकरितां इ० स० १७७२ च्या अवेलीस मद्रासेहून निघून

बंगाल्यास आला. तेव्हां इमहाफ आणि त्याची स्त्री, हीं उभयतां त्याजबरोबरच होतीं.

बंगाल्याचा कारभार हेस्टिंगसाहेब पाहूं लागला तेव्हां तेथची स्थिति कांहीं चमत्कारिक होती. इंग्लिश लोक काळ्या लोकांवर हवा तसा अंमल चालवीत, तरी ते आपणांस राजे म्हणवीत नसत. आम्ही दिल्लीच्या बादशाहाचे नौकर आहों, असें म्हणून ते सर्व कागदपत्र त्याच्या नांवानें करीत; आपल्या टांकसाळेंत त्याच्या नांवाचीं नाणीं पाडीत; परंतु इंग्लिशांच्या यःकश्चित कारकुनाचा जितका वचक लोकांत होता तितका खुद्द नवाबाचा देखील नव्हता.

तेव्हांच्या गव्हर्नरांस हल्लींच्या इतका अधिकार नव्हता. कोणत्याही कामांत त्यांनीं इतर कौन्सिलदारांप्रमाणें मत द्यावें, आणि दोहों पक्षांकडे समान मतें होऊं लागल्यास त्यांचें एक मत अधिक धरावें आणि बहुमताप्रमाणें ठराव करावा, अशी वहिवाट होती. लढाया, तह, परराज्यांशीं ठराव इत्यादि गोष्टी सदरीं सांगितल्याप्रमाणें ठरत, तेणेंकरून कधीं कधीं असें होई कीं, कौन्सिलसभेंत दुफळी झाली म्हणजे गव्हनरांचें म्हणणें एकीकडे राहून कौन्सिलदार म्हणत त्याप्रमाणें सगळें घडे, असा प्रकार होता. हल्लींचा प्रकार याहून कांहीं भिन्न आहे; तो असा.—सर्व कामांचा मुख्य अधिकारी गव्हर्नर आहे, त्यास योग्य कालीं योग्य मसलत देणें, आणि राज्यकारभार चालविण्यास वक्तशीर सहाय करणें, एवढेंच काय तें काम हल्लींच्या कौन्सिलदारांकडे आहे. गव्हर्नरानेंही

त्यांचे विचार हमेषा घेत जावे, असा मुख्य सरकारचा हेतु आहे.

सदरील कलमाच्या पूर्वार्धांत वर्णन केल्याप्रमाणें हेस्टिंग साहेबाच्या वेळीं राज्यकारभाराची व्यवस्था होती व त्याचें आणि त्याच्या कौन्सिलदारांचें वैमनस्य होतें. तेणेंकरून कितीएक वर्षे त्याचा हात राज्यकारभारांत शिरलाच नाहीं.

त्यावेळीं इंग्लिश लोक बंगाल्याच्या राज्यकारभाराकडे फारसें लक्ष्य देत नसत; कारण लढाया करणें, तह ठरविणें इत्यादि गोष्टींकडे त्यांचें सगळें चित्त लागलें होतें. वसुलाच्या व न्यायाच्या कामाकडे कोणी ढुंकूनही पाहात नसे. देशाचा राज्यकारभार इंग्लिश लोक करितात असें लोकांस बाह्यात्कारें दिसे; पण तसा कांहींएक प्रकार नव्हता. बंगालच्या नवाबाचा मुख्य प्रधान मुर्शिदाबादेस राहात असे; त्याच्या हातीं सगळें राज्यव्यवस्थेचें सूत्र होतें. त्याला दरसाल दहा लक्ष रुपये वेतन होतें; आणि शिवाय सालीना तीस लक्ष रुपयांचा नवाबाकडचा खर्च त्याच्याच हातून होत असे. या प्रधानास देशाचें काम बरोबर चालवितां येईना म्हणून याच संधीस त्याजकडून लष्कराचें व परराजांकडील बोलण्याच्या विचाराचें काम काढून इंग्लिशांनीं आपणांकडे घेतलें. तेव्हां त्याच्या हातीं वसूल, न्याय आणि देशांतील बंदोबस्त हीं कामें मात्र राहिलीं. आणि हीं तो बरोबर बजावितो किंवा नाहीं हें पाहणें इंग्लिशांखेरीज दुसऱ्या कोणाकडेही नव्हतें.

एवढ्या मोठ्या जागेविषयीं म्हणजे कोणास लोभ

उत्पन्न होणार नाहीं असें नाहीं. त्याप्रमाणें ती मि-ळविण्यासाठीं मोठे श्रीमान्, वजनदार, उद्योगी, आणि महत्त्वाकांक्षी, अशा दोन पुरुषांनीं प्रयत्न चालविला. त्यांत एक मुसलमान होता, त्याचें नांव महंमद रोजाखान आणि दुसरा बंगाली ब्राह्मण होता, त्याचें नांव महाराज नंदकुमार.

सुराजउद्दवल्याच्या वेळेपासून ह्या ब्राह्मणाच्या हातून पुष्कळ मोटमोठ्या गोष्टी घडल्या होत्या आणि त्यांत ईश्वरानें त्याला संपत्ति, चातुर्य, कपट इत्यादिकांहीं युक्त केलें होतें, तेणेंकरून लोकांत त्याचें वजन फार होतें, व त्यांची त्याजवर निष्ठाही मोठी होती. याच्या कपटी स्वभावाविषयीं एका विद्वान् इंग्लिश ग्रंथकारानें फार चमत्कारिक वर्णन लिहिलें आहे. त्यांत तो असें म्हणतो कीं, इंग्लिश लोकांपेक्षां इटालियन लोक कटपी, इटालियनांपेक्षां हिंदुलोक कपटी, सगळ्या हिंदूंत बंगाली लोक कपटी, आणि अशा बंगाली लो-कांत नंदकुमार हा कपटिशिरोमणि होता. केवळ त्याचीच गोष्ट अशी होती असें नाहीं, तर बंगाली लोकांचा मूळस्वभावच तसा आहे. ते शरीरानें कमकुवत, मनानें हलके व धैर्यहीन आहेत. त्यांस स्वतंत्रतेची आवड नाहीं, सत्यावर निष्ठा नाहीं, नीती-वर श्रद्धा नाहीं, कोणी अरे म्हणेल तर त्यास कारे म्हणण्याचें सामर्थ्य नाहीं, आणि वेळ मारून नेण्यासा-ठीं कोणतेंही अनुचित कर्म करण्यास भय वाटत नाहीं. त्यांचें हरएक कामांत बळकट हत्यार काय तें कपट; दुसरें कांहीं नाहीं. हें विशेष स्पष्ट होण्याकरितां

स्वसंरक्षणाच्या कामीं रेड्यास शिंगें, वाघास नखें, किंवा विंचवास नांगी जशीं साधनीभूत होतात त्याप्रमाणें बंगाली लोकांस कपट, असें म्हटलें तरी चालेल. खोटा कागद करणें, खोटी शपथ वाहणें, खोटी साक्ष देणें, ह्या गोष्टी तर त्यांस करतलामलवत् वाटतात. त्यांच्यांत शिपाईपणा हा कसा तो बिलकूल वसतच नाहीं. यावरून त्यांचा स्वभाव सहज लक्षांत येईल.

नंदकुमार हा मोठा देशाभिमानी व कामकाजांत पटाईत आहे असें सर्व लोकांस वाटत होतें आणि तें बहुतांशीं खरें होतें यांत संशय नाहीं, तरी इंग्लिशांनीं खोट्या कागदाच्या वगैरे कपटकर्मांत एक दोन वेळ पकडून त्याला बरेंच फजीत केलें. नंतर त्याची एक मोठी लबाडी उघडकीस आली. ती अशी कीं, तो आपणास बाह्यात्कारें इंग्लिशांचा दोस्त म्हणवीत असतां दिल्लीचा बादशाहा व कर्नाटकांतील फ्रेंच अधिकारी यांनीं त्यांच्या विरुद्ध जो मोठा गुप्त कट चालविला होता त्यांतील सर्व पत्रव्यवहार हा करीत असे. ह्या गोष्टीच्या चौकशीअंतीं पुरावा झाल्यावर त्याला इंग्लिशांनीं कांहीं दिवस प्रतिबंधांत ठेविलें होतें. तथापि तितक्याही गोष्टीस विरजण घालून त्यानें आपल्या शहाणपणाच्या बळानें आपली सुटका करून घेतली; आणि पुनः पहिल्याप्रमाणें लोकांत आपला बस बसविला.

प्रधानकी कोणास द्यावी याची पुष्कळ वाटाघाट होऊन शेवटीं क्लैवसाहेबानें महंमद रेजाखानास वस्त्रें देवविलीं. तेव्हां नंदकुमाराची अगदीं निराशा झाली;

आणि तो अधिकार प्राप्त झालेल्या आपल्या मुसलमान शत्रूचा फार द्वेष करूं लागला.

हेस्तिंग साहेब बंगालचा गव्हर्नर होऊन आला तेव्हां सदरील नेमणुकीस सुमारें सात वर्षें होऊन गेलीं होतीं. मीरजाफराचा अल्पवयस्क मुलगा गादीवर होता; आणि सर्व कारभार प्रधान पाहात असे. प्रांतांचें उत्पन्न क्लैवसाहेबाच्या व्यवस्थेप्रमाणें इंग्लिशाकडे जमा होत असे. परंतु हिंदुस्थानाप्रमाणें दुसरा कोणताच मुलूख धनत्तर नाहीं, अशी दंतकथा विलायतेंतील कंपनीच्या मुख्य कामगारांच्या मनावर अगदीं बळकट ठसून गेली होती, त्यामुळें त्यांस तें उत्पन्न फारच थोडें वाटत असे; आणि उत्पन्नाची इतकी कमताई पडण्यास, हिंदुस्तानांतील कारभाऱ्यांची लबाडी कारण आहे, असें ते उघड बोलत असत. शेवटीं, ह्या गोष्टीचा विलायतेस गवगवा झाला; आणि महंमद रोजाखानाचा नाश करण्यास, बहुत दिवसांपासून टपलेला जो मागें सांगितलेला कपटिशिरोमणि ब्राह्मण त्यानें आपल्या तेथच्या वकिलास नानाप्रकारच्या गोष्टी कळवून, त्याजकडून त्या मुख्य कामगारांचे कान भरविले. तेव्हां त्यांनीं हेस्तिंग साहेबास फार जलदीनें असा हुकूम पाठविला कीं, तुम्ही मुर्शिदाबादेस जाऊन नंदकुमाराच्या मदतीनें महंमद रोजाखानाच्या वाड्याची एकदम जप्ती करावी, त्यांस त्यांच्या मुलांमाणसांसुध्धां व त्याच्या पक्षाच्या लोकांसुध्धां कैद करावें; आणि त्याच्या राज्यकारभाराची चौकशी फार बारीक रीतीनें चालवावी.

या हुकुमानें नंदकुमारास आनंद झाला, परंतु त्याचा व हेस्तिंगसाहेबाचा कांहीं कारणावरून पूर्वी मोठा वाद झाला होता, तेव्हांपसून ते एकमेकास पाण्यांत पाहात होते; म्हणून त्या हुकुमांत त्याचें नांव असल्यामुळें साहेबास कांहींसें वाईट वाटलें; परंतु करतो काय? हुजूरच्या हुकुमापुढें त्याचा इलाज खुंटला. शेवटीं त्या आज्ञेप्रमाणें महंमद रोजाखानास मुर्शिदाबाद येथें रात्रीं निजल्या जागीं कैद केलें, आणि शिताबराय म्हणून एक गृहस्थ बाहारप्रांताचा सुभेदार होता त्यालाही मिलाफी असल्याच्या आरोपावरून कैद केलें. त्या दोघांस कलकत्त्याकडे रवाना करून दिल्यावर मग हें वर्तमान कौंसलदारांस समजलें. तोंपर्यंत त्यांस त्याची वार्ता देखील माहीत नव्हती. असें होण्याचें कारण इतकेंच कीं, तो हुकूम फक्त हेस्तिंग साहेबाच्याच नांवानें आला होता.

दोघांचें भांडण आणि तिसऱ्यास लाभ, या म्हणीप्रमाणें सदरील गोष्टींचा परिणाम झाला तो असा.— महंमद रोजाखानास कैद करतांच, हेस्तिंग साहेबानें ती दिवाणगिरीची जागा अजीं कमी केली, आणि त्याजकडे जें काम होतें तें सर्व इंग्लिशांकडे घेतलें. नवाबास केवळ रयतेप्रमाणें कांहीं पेनशन करून देऊन घरीं बसविलें. तो लहान होता म्हणून त्याच्या पालनपोषणाकरितां, त्याच्या बापाच्या वेळची मणी बेगम म्हणून एक चांगली स्त्री होती, तिची नेमणूक केली, आणि त्याच्या घरचा इतर कारभार, नंदकुमाराचा मुलगा राजा गुरुदास यास सांगितला.

याप्रमाणें राज्यक्रांति पुरती केल्यावर, हेस्टिंग साहेबानें सदरील दोन कैदींची चौकशी सुरू केली. तींत शिताबराय प्रथमतःच निर्दोष ठरला, आणि सुटला. महंमद रोजाखानाच्या मुकदम्यास आरंभ होतांच, नंदकुमार पुढें सरसावून त्याजवर गुन्ह्याची शाबिदी करूं लागला. त्यानें त्या कामीं आपली पराकाष्ठा केली, तरी शेवटीं कांहीं झालें नाहीं. निरपराधी म्हणून महंमद रोजाखानास हेस्टिंग साहेबानें एकदम सोडून दिलें. तेव्हां ज्या जागेकरितां इतका भगीरथ प्रयत्न केला ती जागा कमी झाली. आणि ज्या वैऱ्याच्या नाशार्थ इतका इलम बांधिला. तो वैरी याच्या केसासही ढका न लागतां सुटून गेला, हें पाहून नंदकुमाराच्या पायांची आग मस्तकीं गेली. आणि त्या वेळेपासून त्यानें हेस्टिंग साहेबाचा फार द्वेष धरिला.

इतक्या गोष्टी झाल्या नंतर हेस्टिंग साहेबानें राज्यव्यवस्थेकडे लक्ष्य दिलें. तो पाहूं लागला तों खजीन्यांत पैसा शिलक नव्हता; आणि तुम्ही कांहीं करा, पण पैसा पुष्कळ पाठवा, अशा अभिप्रायाचे सक्तीचे हुकूम त्याला विलायतेहून कंपनी सरकाराकडून वारंवार येऊं लागले. तेव्हां मिळेल त्या रीतीनें पैसा मिळवून हुकुमाप्रमाणें विलायतेस पाठविणें, किंवा चाकरी सोडणें, या दोहोंतून कोणती तरी एक गोष्ट करणें भाग आहे असें पाहून, त्यानें ब्रह्मज्ञान एकीकडे ठेवून, न्यायान्याय मनांत न आणितां, खजीना भरण्याच्या उद्योगास आरंभ केला.

हेस्टिंगासारख्या समयसूचक, बुद्धिमान्, आणि साहसी पुरुषास हिंदुस्थानामध्यें पैसा काढण्याची युक्ति न सुचली, तर तो मोठा चमत्कारच समजला पाहिजे. त्यानें प्रथमतः बंगालच्या नबाबाच्या वेतनाची रकम, जी तीसलक्ष रुपये होती ती एकदम निमे, म्हणजे पंधरा लक्षांवर आणिली. पूर्वीं मोंगल सरकारानें इंग्लिशांस कांहीं प्रांत दिले होते, त्यांबद्दल व खंडणीसारख्या कांहीं देणगीबद्दल, त्यांस त्याजकडे असलेले कोरा व अलहाबाद हे प्रांत देऊन शिवाय त्यास दरसाल तीस लक्ष रुपये भरावे लागत असत, तें त्यानें, मोंगल खंडणी घेण्यासारखा प्रबल नाहीं, असें निमित्त लावून देण्याचें बंद केलें; व ते दोन्ही प्रांत परत घेऊन अयोध्येच्या नबाबास पांच लक्ष रुपयांस विकले.

पैसा काढण्याचा आणखी एक प्रसंग हेस्टिंग साहेबास लवकरच साधला. त्याचा प्रकार असा— अयोध्येचा नबाब सुजाउद्दवला, याचा रोहिलखंडावर कोणत्याही प्रकारें वारसा नसतां, तें घेण्यासाठीं तो बहुत दिवस टपला होता; परंतु तेथचे लोक (रोहिले), स्वभावानें तुसड, शूर, आणि स्वतंत्रतेनें राज्य हाकणारे अशी त्यांची आख्या पहिल्यापासून होती, म्हणून त्यांजवर हल्ला करण्यास त्याला सहसा धैर्य होईना. तरी कोणी बलिष्ठ साहाय्य करील तर एकादा यत्न करून पहावा, असें त्याच्या मनांत होतें. ती त्याच्या मनांतील गोष्ट घडून येण्यास हा प्रसंग फार चांगला सांपडला. हेस्टिंग साहेबास द्रव्य पाहिजे होतें, तें

सुजाउद्दवल्याजवळ विपुल होतें; आणि सुजाउद्दवल्यास शूर सैन्याची गरज होती, तें हेस्टिंग साहेबाच्या ताब्यांत होतें. तेणें करून उभयतांचा सवदा तत्काळ जमला. त्याचा ठराव असा झाला कीं, हेस्टिंग साहेबानें इंग्लिशांचें सैन्य, सुजाउद्दवल्यास, रोहिलखंडावर स्वारी करण्याकरितां द्यावें; आणि त्याबद्दल त्यानें हेस्टिंग साहेबास, सैन्याच्या जाण्यायेण्याच्या खर्चाशिवाय, निराळे एकरकमी चाळीस लक्ष रुपये द्यावे.

ह्या ठरावाप्रमाणें इंग्लिश सैन्यासह सुजाउद्दवल्यानें रोहिलखंडावर स्वारी करून, तेथच्या लोकांस मारहाणीच्या तडाक्यांनीं आपल्या ताब्यांत आणिलें तें असो; पण रोहिलखंडाकडे आपला बिलकुल संबंध नसतां, केवळ द्रव्याच्या लोभानें, न्यायान्याय न पाहतां, त्या गरीबांवर शस्त्र धरण्याकरितां, हेस्टिंग साहेबानें नबाबाला सैन्य दिलें. येणें करून त्याच्या कीर्तीस मोठा कलंक लागला आहे, तो कदापि नाहींसा व्हावयाचा नाहीं.

याप्रमाणें, लोकांवर कर वगैरे न बसवितां दोन वर्षांत, कंपनीसरकारच्या हुकुमाप्रमाणें विलायतेस पुष्कळ पैसा पाठवून, एथच्या खजीन्यांतील पैशाची चणचण नाहींशी केली.

इतक्यांत, म्हणजे इ० स० १७७३ सालीं पार्लमेंट सभेमध्यें, हिंदुस्तानांतील राज्यव्यवस्थेविषयीं पुष्कळ वाटाघाट होऊन, त्याच्या व्यवस्थेकरितां रेग्युलेटिंग "आक्ट" या नांवाचा एक कायदा ठरला.

त्यावरून बंगालच्या गव्हर्नरास गव्हनरजनरल म्हणावें, त्यानें सगळ्या हिंदुस्तानाचा राज्यकारभार पहावा; त्यापासून अगदीं स्वतंत्र असें एक बादशाही कोडत कलकत्यास असावें; आणि कामकाजांत मदत करण्याकरितां, पांच पांच वर्षांच्या नेमणुकीचे असे ४ कौन्सिलदार त्याला असावे; इतके ठराव झाले. त्याप्रमाणें हेस्तिंग साहेब पहिला गव्हर्नर जनरल झाला; आणि बारवेल, क्लावरिंग, म्यानसन, व फ्रान्सिस हे कौन्सिलदार नेमिले. त्यांपैकीं पहिला हिंदुस्तानांतच असून त्याचें व हेस्तिंग साहेबाचें सख्य होतें. बाकीचे तिघे विलायतेहून यावयाचे होते. ते येतांक्षणींच त्यांच्या सन्मानार्थ १७ तोफांची सरबत्ती करण्याचा हुकूम हेस्तिंग साहेबांनीं केला; परंतु आपणांस २१ तोफांची सरबत्ती व्हावी असें त्यांच्या मनांत असल्यामुळें झालेली सरबत्ती त्यांस आवडली नाहीं. आणि गर्वनर जनरलानें हा सकृद्दर्शनीं आपला मोटा अपमान केला, असें त्यांस वाटून तेव्हांपासून त्यांच्या वैरास आरंभ झाला आणि शेवटीं तेंच हेस्तिंग साहेबाच्या नाशास कारण झालें.

दुसऱ्या दिवशीं काम सुरू झाल्यावर लागलीच दुफळी झाली. म्हणजे हेस्तिंग साहेब आणि बारवेल साहेब हे एकीकडे; व नवे आलेले तिघे एकीकडे. ह्यांनीं म्हणावें तें त्यांनीं मोडावें, आणि त्यांनीं म्हणावें तें ह्यांनीं मोडावें, असें चाललें. तीन असामींच्या फळींत फ्रान्सिस नांवाचा जो मनुष्य होता, तो

मोठा विद्वान्, चपळ आणि आपल्या कामांत परम दक्ष असा होता, यामुळें त्यापुढें कोणाचें तेज पडेना. खुद्द गवर्नर जनरलाचें देखील कोणी ऐकेना. ते तिघे जें म्हणत तें करीत. हेस्तिंग साहेबाच्या आज्ञेवरून इंग्लिशांचें सैन्य अयोध्येच्या नवाबाबरोबर रोहिलखंडांत गेलें होतें त्यास त्यांनीं गवर्नर जनरलास कळविल्यावांचून एकदम परत बोलाविलें आणि इतर कामांत नाना प्रकारचे दोष काढून ते त्याची उघडपणें निंदा करूं लागले.

नंतर त्यांनीं राज्याच्या अंतस्थ कामांत हात घातला तेणेंकरून दुसरें तर कांहीं झालें नाहीं; परंतु जीव व जिंदगी ह्यांच्या रक्षणाची मुष्कील पडली आणि "बळी तो कान पिळी" ह्या न्यायानें वागण्याचें लोकांनीं आरंभिलें. मोठ मोठीं कामें ते तिघे पाहात; आणि हलकीं सलकीं कामें मात्र हेस्तिंगाकडे येत असत; तथापि हिंदुस्तानाचा राज्यकारभार चालविण्यांत हेस्तिंग साहेबाइतका दुसरा कोणीही हुशार नाहीं, असें ते लोकांसमक्ष कबूल करीत असत.

याप्रमाणें हेस्तिंग साहेबावर तीन कौन्सिलदार उठले; तेव्हां त्याच्या शत्रूंसही अधिक बळ आलें. थोडक्याच दिवसांत गव्हर्नर जनरलावर कौन्सिलामध्यें पुष्कळ फिर्यादी पडल्या. हें पाहून नंदकुमारानेंही कंबर बांधिली. त्यानें कौन्सिलदारांकडे येऊन, हेस्तिंग साहेबानें मणिबेगम व गुरुदास यांच्या नेमणुकी करण्यांत पैसा खाल्ला, अशा पुराव्याचा एक कागद दिला. त्यावरून ते तिघे त्याच्या चौकशीस

बसले. तेव्हां माझी चौकशी करण्यास तुम्हांस अधिकार नाहीं असें बोलून, हातपाय आपटीत हेस्तिंग साहेब कचेरींतून उठून गेला. त्याच्या मागून त्याच्या पक्षाचा कौन्सिलदार बारवेल हाही चालता झाला. तेणेंकरून अध्यक्षाची जागा रिकामी पडली, तिजवर सर्वानुमतें क्लावरिंग बसला. आणि सर्व पुरावा पाहून त्यांनीं असा ठराव केला कीं, हेस्तिंग साहेबानें सदरील नेमणुकांच्या कामीं ३ किंवा ४ लाख रुपये लांच खाल्ला, तो त्यानें तावडतोब परत दिला पाहिजे.

असें होऊं लागलें तेव्हां विलायत सरकार तरी आपली दाद घेतें किंवा नाहीं, याची हेस्तिंग साहेबास धास्ती पडून त्यानें, तेथच्या आपल्या माक्लीन नामक मुनिमाकडे आपल्या कामाचा राजीनामाही पाठविला. आणि त्याला असें लिहिलें कीं; जर सरकारचा कल माझ्या वैऱ्यांकडे दिसला तरच हा राजीनामा गुदरावा, नाहीं तर कांहीं कारण नाहीं.

हिंदुस्थानांत शककर्ते काय ते हे तिघे कौन्सल-दार आहेत, अशा समजुतीनें नंदकुमार अगदीं त्यांच्या भक्तीस लागला. तेही त्याजवर मोटी मेहेर-बानी ठेवूं लागले. अशा रंगांत तो होता इतक्यांत त्या तिघांचा हाडवैरी इलायझा इंपी साहेब कलकत्या-च्या बादशाही कोर्ताचा जज्ज यानें त्याला खोटा दस्तऐवज केल्याच्या आरोपावरून एकदम कैद केलें. त्याला जामिनावर सोडवून आणण्याची त्या तिघांनीं आपली पराकाष्ठा केली; परंतु जज्जानें कांहीं एक

ऐकिलें नाहीं, आणि कोर्त सुरू झाल्यावर त्याची चौकशी करून त्याला एकदम फांशीची शिक्षा ठरविली; आणि ती लवकरच अमलांत आणिली. असा नंदकुमाराचा शेवट झाला.

नंदकुमार हा पुरुष मोठ्या धैर्याचा होता. तो आतां मरावयाचा असें फांशीं देण्याच्या ठिकाणीं आलेल्या लोकांस वाटून, त्यांच्या नेत्रांतून अश्रुधारा चालल्या होत्या व केवळ एवढ्याशा अपराधावरून आमच्या एवढ्या मनुष्याचा इंग्लिश लोक जीव घेणार नाहींत, असें कितीएकांस वाटत होतें. परंतु तो धिमा पुरुष पालखींत बसून फांसाजवळ आला तेव्हां मात्र सर्वांचा धीर सुटला मग त्यानें माझ्या तिघां कौन्सिलदार मित्रांनीं माझें स्मरण धरावें, आणि माझ्या पश्चात् माझ्या गुरुदासाचा पुत्रवत् सांभाळ करावा एवढेंच शेवटचें मागणें आहे असें म्हणून गळ्यांत फांस अडकविला तरी त्याच्या चर्येंत फरक पडला नाहीं, यावरून त्याचें हृदय किती कठोर असेल बरें!!!

हा खोट्या कागदाचा खटला बऱ्याच दिवसांमागें उत्पन्न झालेला असून, अशा आणीबाणीच्या प्रसंगीं तो बाहेर पडला, आणि नंदकुमारास मारून टाकिलें. हें कर्तृत्व हेस्टिंग साहेबाचें असावें असा पुष्कळांस संशय आहे. आणि, 'इंपी साहेबानें मला एका समयीं महत्संकटांतून मुक्त केलें, म्हणून मी त्याचे उपकार जन्मोजन्मीं विसरणार नाहीं,' असा खुद्द हेस्टिंग साहेबाच्या हातचा लेख आलीकडे प्रसिद्ध झाला आहे,

त्यावरून तो प्रसंग हाच असावा असें सर्वांच्या मनांत येऊन चुकलें आहे.

सदरील घडामोडींत हेस्टिंगसाहेबास फार त्रास भोगावे लागले, तरी त्यानें इतकें झालें कीं, गव्हर्नर जनरल एकीकडे आणि सगळे कौन्सिलदार एकीकडे झाले; तरी परिणामीं गव्हर्नरजनरलाच्याच पक्षास जय येतो, असें लोकांच्या मनांत पक्कें ठसलें. तेणें-करून हेस्टिंगसाहेबाला ते फार वचकूं लागले, आणि त्याचें काम पहिल्यापेक्षां सुरळीत चालूं लागलें. त्याजवर एवढें मोठें संकट आलें होतें तरी त्याचें धैर्य खचलें नाहीं. नंदकुमाराचा वध झाल्यावर थोडक्याच तासांनीं आपला विद्वान् स्नेही दाक्तर जानसन यास एक पत्र लिहिलें त्यांत त्यानें स्वस्थ चित्तेंकरून जोन्सकृत पारशी भाषेचें व्याकरण, हिंदुस्तानाचा इतिहास व येथील पदार्थ इत्यादिकांचें वर्णन फार पसंत केलें आहे. ही गोष्ट त्याच्या स्वभावास मोठी भूषणप्रद आहे यांत संशय नाहीं.

इकडे नंदकुमार संपला व हेस्टिंगाच्या शत्रूंचा जोर कमी झाला, इतक्यांत विलायतेस पार्लमेंत सभेमध्यें हिंदुस्तानच्या आलीकडील कारभाराविषयीं पुष्कळ विचार होऊन गव्हर्नरजनरलानें रोहिलखंडावर सैन्य पाठविलें, हा त्याचा मोठा अपराध आहे असें सर्वानुमतें ठरलें. दायरेक्तर लोक म्हणजे ज्यांनीं त्याला हुशार म्हणून गव्हर्नरजनरल नेमिलें होतें व ज्यांची मर्जी राखण्यासाठीं त्यानें आपला जीव धो-क्यांत घातला होता ते देखील या प्रसंगीं त्याजवर

उलटले; आणि त्यास कामावरून दूर करण्यास तयार झाले. त्यास मुख्य प्रधानाचेंही अनुमत पडलें. परंतु प्रोपरायटर लोकांच्या सभेंत ऊहापोह झाला त्यांत त्याला हितावह अशा बऱ्याच गोष्टी निघाल्या. त्यांचा दायरेक्तर लोकांस फार राग आला व मुख्य धप्रा-नाची मर्जीही खप्पा झाली; परंतु त्याचें कांहींच चाललें नाहीं.

याप्रमाणें हेस्टिंगाच्या शत्रूंचीं तोंडें बसलीं तरी ते शेवटीं कदाचित् आपलेंसें करतील असें भय पडून हेस्टिंगसाहेबाच्या मुनिमानें त्याच्या कामाचा आलेला राजीनामा सरकारांत गुदरला. तो दायरेक्तर लो-कांनीं मोठ्या संतोषानें पसंत केला; आणि त्याच्या जागेवर आपणापैकीं व्हेलर नामक एका गृहस्थास नेमिलें. आणि तो हिंदुस्तानांत पोहोंचे पर्यंत गव्हर्नरजनरलाचें काम क्लावरिंग यानें पाहावें असा ठराव केला.

इतक्या गोष्टी विलायतेस घडत असतां, इकडे बंगाल्यामध्यें कौन्सिलदारांच्या त्रिकुटापैकीं म्यानसन साहेब मृत्यु पावला. तेव्हां त्या पक्षाचे दोन बाकी राहिले त्यांचीं दोनच मतें; परंतु दुसऱ्या पक्षाकडे दोघेच होते तरी गव्हर्नरजनरलाचीं दोन आणि बारवेल साहेबाचें एक अशीं तीन मतें झालीं, तेव्हां हेस्टिंगसाहेबाचें चांगलें जमलें. सर्व कामकाजें त्याच्या हातीं आलीं, आणि युक्तिप्रयुक्तीनें भोंसले व अयोध्येचा नवाब यांच्या मुलखांत आपलीं ठाणीं ठेवून हळूहळू सगळ्या हिंदुस्तानाचें आधिपत्य आप-

णाकडे आणावें असा कांहीं बेत त्यानें चालविला होता, इतक्यांत नौकरी गेल्याची बातमी येऊन पोहोंचली. तेव्हां त्याचें मन फार विरस झालें.

तथापि त्यानें धीर सोडिला नाहीं. खुद्द दायरेक्तर लोकांकडून सदरील टरावाप्रमाणें हुकूम आले होते तरी त्यांसही त्यानें जुमानिलें नाहीं. राजीनामा घेण्याविषयीं मी सरकारास कधींही विनंती केली नाहीं वगैरे अनेक सबबी काढून काम न सोडण्याचा त्यानें दृढनिश्चय केला. क्लावरिंग साहेबानें दप्तर आपल्या ताब्यांत घेऊन किल्ल्याच्या व खजिन्याच्या किल्ल्या मागून आणण्यासाठीं हेस्तिंगसाहेबाकडे मनुष्य पाठविला. तो देईना. त्या एका दिवाणखान्यांत क्लावरिंग साहेब अध्यक्षस्थानीं ( गव्हर्नरजनरलाच्या जागीं ) बसून फ्रान्सिसाच्या मदतीनें काम करूं लागला; दुसऱ्यांत आपल्या पूर्वींच्या डौलानें हेस्तिंग साहेबही बारवेल साहेबास बरोबर घेऊन कचेरी करून बसला. दोघेही हटास पेटले. पुष्कळ कामदार लोक हेस्तिंग साहेबाच्या पक्षाचे होते; त्यांस त्यानें आपणाखेरीज दुसऱ्या कोणाचाही हुकूम न मानण्याविषयीं सक्त ताकीद दिली. शेवटीं कित्येकांच्या मध्यस्थीनें बादशाही कोर्ताचे जज्ज जें सांगतील त्याप्रमाणें उभयतांनीं वर्तावें, या ह्मणण्यास दोघेही कबूल झाले. त्या जज्जानें कागदपत्र वगैरे पाहून हेस्तिंग साहेबाचें ह्मणणें रास्त आहे असें टराविलें. तेव्हां क्लावरिंग साहेबास चप्प बसणें भाग पडलें.

ह्या जयोत्सवामध्यें इमहाफच्या बायकोच्या अर्जीचा निकाल फ्रांकोनियाच्या कोर्तांत तिच्या इच्छेप्रमाणें झाल्याची बातमी आली, तेव्हां हेस्टिंगास फार समाधान वाटलें, तिनें लागलीच आपल्या नवऱ्यास काडी मोडून देऊन वाटेस लाविलें. नंतर या आपल्या सुंदर प्रियवधूशीं हेस्टिंग साहेबानें लग्न केलें, त्याचा त्यानें मोठा समारंभ केला; तेव्हां सगळे वडे लोक त्याजकडे आले होते. क्लाव-रिंग मात्र आजारी असल्यामुळें आला नव्हता. त्यास मुद्दाम आपण खुद्द त्याच्या वाड्यांत जाऊन हेस्टिंग साहेबानें आपल्या घरीं आणिलें. पुढें थोडक्याच दिवसांनीं तो त्या दुखण्यानें मरण पावला.

इक्यांत व्हेलरसाहेब काम करण्याच्या मोठ्या उमेदीनें येऊन दाखल झाला; परंतु हेस्टिंगानें त्याची टांकी लागूं दिली नाहीं. म्हणून त्याला कौन्सिलदारीचीच जागा पतकरून स्तब्ध बसावें लागलें. तो फ्रान्सिस साहेबाच्या मतास मिळाला; परंतु त्यावेळीं हेस्टिंगसाहेबापुढें कोणाचेंच चालेनासें झालें. सर्व काम हेस्टिंग साहेब हाकूं लागला. इतक्यामध्यें विलायतच्या लोकांत त्याच्या विषयीं जो वैरभाव उत्पन्न झाला होता तो अगदीं विरून गेला. दायरेक्तर लोकांचीं मनें फिरलीं. त्यांनीं त्याची मुदत सरली होती ती आणखी वाढवून त्यासच त्या जागीं कायम केलें.

जे दायरेक्तर लोक थोडक्याच दिवसांपूर्वीं त्याला काढून टाकण्यास तयार झाले होते ते एकाएकीं

त्याच्या हिताकडे कसे वळले हा प्रश्न येथें उत्पन्न होतो. त्याचें समाधान असें आहे कीं, त्या संधीस अमेरिका, फ्रान्स, स्पेन आणि बाल्तिक समुद्रांतील बेटें यांतील लोक ग्रेतब्रितनावर अगदीं बिथरून गेले होते आणि हिंदुस्तानामध्यें शिंदे, व होळकर, यांनींही गडबड मांडिली होती. अशा संकटाच्या वेळीं हिंदुस्तानांतील आपल्या मुलखाचें रक्षण करण्यास त्यांतला पक्का माहितगार व हुशार हेस्तिंग साहेबासारखा दुसरा कोणी नाहीं अशी गोष्ट त्यांच्या मनांत पूर्णपणें बिंबल्यावरून त्यांनीं सदरील ठराव केला.

पुढें तो राज्यव्यवस्था फार बारकाईनें पाहूं लागला, तेव्हां फ्रान्स देशाचा बादशाहा १६ वा लुई याजकडून एक वकील पुष्कळ पत्रें व नजराणे घेऊन पुण्यास आला आहे व तेथें इंग्लिशांस हिंदुस्तानांतून हाकून लावण्याविषयीं पेशवे व फ्रेंच ह्यांच्या मसलती चालल्या आहेत अशी गुणगूण हेस्तिंग साहेबास कळली. तिच्या सावधागिरीकरितां त्यानें वऱ्हाड प्रांतांतील संस्थानिक भोंसला याचें साहाय्य मागितलें तें देण्यास तो कबूल झाला, तेव्हां त्यास हाताशीं धरून राघोबादादास पेशवाईची गादी मिळवून देण्याच्या निमित्तानें पुण्यावर स्वारी करावी आणि पेशव्यांची वळवळ मोडून टाकावी असा हेस्तिंग साहेबानें निश्चय केला. इतक्यांत इंग्लंद व फ्रान्स यांच्या मध्यें लढाई सुरू झाल्याची खबर आली ती कानीं पडतांच बंगाल्यामध्यें फ्रेंच लोकांच्या ज्या वखारी वगैरे होत्या त्या हेस्तिंग साहेबानें जप्त

करवून आपल्या ताब्यांत घेतल्या, पांदिचरीवर हल्ला करण्याविषयीं मद्रास सरकारास लिहिलें, हुगळी नदींत आरमाराचा पाहारा बसविला, आणि काळया लोकांच्या ९ पलटणी नव्या भरल्या. पुढें लवकरच मराठे व इंग्लिश यांची लढाई सुरू झाली. ती राहून राहून चार वर्षें पर्यंत चालली होती. तींत गोदर्द साहेब व पाफम साहेब वगैरे सरदारांनीं पुष्कळ पराक्रम करून अमदाबाद, ग्वालेर इत्यादि शहरें घेतलीं. तरी एकंदरीनें इंग्लिशांचें पुष्कळ नुकसान झालें.

क्लावरिंग साहेबाच्या जागेवर सर एरकूट नामक साहेबाची नेमणूक झाली, आणि तो आपल्या कामावर आला. तो गव्हर्नरजरलाच्या धोरणानें वागण्यास जरी मनापासून खुष नव्हता तरी त्यानें त्याचा कधीं द्वेष केला नाहीं. कर्नाटकांत फ्रेंचांस हतवीर्य करून व वांदिवाश येथें मोठा जय मिळविल्यावरून त्याची पूर्वींच पुष्कळ कीर्त्ति झाली होती. त्याला द्रव्यादिकें-करून वश करून घेण्याविषयीं हेस्टिंग साहेबानें यत्न करून पाहिला; परंतु तो सिद्धीस गेला असें दिसत नाहीं. असा दुफळीचा विसकट झाल्यावर बादशाही कोर्टाचा जज्ज इंपी साहेब यानें द्रव्य-लोभ धरून वंडाळी मांडिली होती तीही युक्तिप्रयुक्ती-नें हेस्टिंग साहेबानें मोडून टाकली. या कृत्यांत त्याचे बरेच दिवस गेले.

इंपी साहेबाची गडबड मोडण्यांत हेस्टिंग साहेबानें जी वर्तणूक केली ती फ्रान्सिस साहेबाला बिलकुल

आवडली नाहीं, आणि आपल्या प्रतिपक्ष्याचा दिवसेंदिवस अधिक पगडा पडत चालला असें वाटून त्याला फार त्वेष आला. तेव्हां, मरेन कीं मारीन, असा त्यानें निश्चय केला. आपण द्वंद्वयुद्ध करून आपला कलह संपवूं असें त्यानें हेस्टिंग साहेबास सांगून पाठविलें. तोही त्यास कबूल झाला. त्याप्रमाणें त्यांचें द्वंद्वयुद्ध झालें, त्यांत हेस्टिंग साहेब अजीं बचावला आणि फ्रान्सिसास एक गोळी लागली. तिच्या योगानें तो बरेच दिवस आजारी पडाला होता.

इकडे मद्रास इलाख्यांत म्हैसूरचा मुसलमान जुलमी राजा महंमदअल्ली यानें मोठा दंगा माजविला. त्याचें नव्वद हजार सैन्य शंभर तोफांसह इंग्लिशांच्या मुलखांत येऊन धामधूम करूं लागलें. त्यास फ्रेंच लोक सहाय होते. तेव्हां खुद्द मद्रास शहराचें तरी रक्षण होतें किंवा नाहीं याचा विचार पडला. किल्ले वगैरे मजबूत जागा त्याच्या ताब्यांत गेल्या होत्या. हेक्टर मनरो व बेली हे दोन साहेब आपलीं सैन्यें घेऊन त्यांचा पराभव करण्याच्या यत्नांत होते. परंतु आपलीं सैन्यें एकत्र करून हल्ला करण्याचें सोडून ते त्याशीं निरनिराळे लढूं लागले, ह्मणून त्यांचा पराभव झाला व त्यांचे पुष्कळ लोक मेले. देशांत बेबंदी होऊन गेली. जीव व जिंदगी यांच्या रक्षणाची लोकांस पंचाईत पडली. तेथील इंग्लिशांवर फ्रेंच हल्ला करणार अशी बातमी उठली. तेणें करून लोक तर अगदीं घाबरून गेले, आणि त्या संधीस ग्रेताब्रितन देशाला त्याच्या

शत्रूंनीं अगदीं अडवून टाकिलें होतें; तेव्हां तिकडून मदत येण्याचीही कांहीं आशा नव्हती. हें सगळें वर्तमान हेस्तिंग साहेबास समजलें. तेव्हां त्यानें लागलेंच सर एरकूट साहेबाला पुष्कळ सैन्यानिशीं हैदराच्या सैन्यावर पाठविलें. त्यानें फ्रेंचांची फौज येऊन पोहोंचण्याच्या पूर्वींच शत्रूच्या सैन्यास गांठिलें आणि मोठा संग्राम करून पोर्टोनोव्हो येथें मोठा जय मिळविला; तेणेंकरून इंग्लिशांची सत्ता दक्षिण हिंदुस्तानांत विशेष कायम झाली.

याच सुमारास फ्रान्सिस साहेब आपलें काम सोडून स्वदेशीं गेला. तेणेंकरून हेस्तिंग साहेबाच्या मनाप्रमाणें सगळीं कामें चालूं लागलीं. कारण व्हेलर देखील मग कंटाळून त्यास अनुकूल झाला होता.

दुफळीच्या त्रासांतून याप्रमाणें पार पडला तों लागलीच दुसरी अडचण त्याच्या पुढें उभी राहिली, ती ही कीं फ्रेंच व हैदर यांशीं लढाया चालविण्यास व दायरेक्तर लोकांच्या मर्जीप्रमाणें गलबतांचीं गलबतें भरून खजीना विलायतेस पाठविण्यास द्रव्य मिळविण्याची आवश्यकता पडली. ती दूर करण्यास मागच्या सारखीच जुलमाची युक्ति त्यानें काढिली, ती अशी.— कांहीं वर्षांपूर्वीं काशीचा राजा आपणास अयोध्येच्या नबाबाचा सेवक म्हणवीत असे. पुढें तो नबाब त्याजवर जुलूम करूं लागला तेव्हां त्यानें इंग्लिशांपाशीं मदत मागितली, ती त्यांनीं दिली. नंतर कांहीं कालानें तो नबाब आणि इंग्लिश यांचा तह झाला तेव्हां त्या राजाचें स्वामित्व इंग्लिशांकडे

आलें, आणि जी खंडणी तो नवाबास देत असे ती त्यानें तदनंतर इंग्लिशांस द्यावी असें ठरलें. त्यावेळीं जो राजा गादीवर होता त्याचें नांव चैतसिंग असें होतें. तो ठरावाप्रमाणें वागण्यास फार जपत असे, व खंडणी वेळच्या वेळीं पोंहोचवून इंग्लिशांशीं मोठ्या सावधीनें व नम्रतेनें वागत असे. तरी तो जुलुमापासून चुकला नाहीं. त्याच्या वाडवडिलांनीं पुष्कळ पैसा जमवून ठेविला होता हें हेस्तिंग साहेबास ठाऊक होतें. आणि त्याला द्रव्याची गरज होती म्हणून त्यानें इ० स० १७७८ त फ्रेंचांशीं युद्ध चाललें असतां त्याला असें सांगून पाठविलें कीं, तुम्ही दरसाल जी खंडणी देतां तिजपेक्षां सालमजकुरीं पांच लक्ष रुपये अधिक दिले पाहिजेत. त्या बिचाऱ्यानें कांहीं गडबड न करितां तितके भरले. पुनः दुसऱ्या वर्षीं तसेंच झालें. तिसऱ्या वर्षीं साहेबानें त्याला असा हुकूम केला कीं, दरसालची ठरलेली खंडणी आणि पांच लक्ष रुपये भरून, शिवाय आणखीही पुष्कळ पैसा तुम्ही आम्हांकडे पाठविला पाहिजे. तेव्हां रकम कमी करण्याविषयीं चैतसिंगानें हेस्तिंग साहेबाची नानाप्रकारें विनवणी केली आणि २ लाख रुपये लांच देण्यासही कबूल झाला. तो लांच त्यानें प्रथमतः घेतला; पण मग उघाडीस येऊं लागला म्हणून सरकारांत जमा केला; तरी त्यानें आपलें म्हणणें सोडिलें नाहीं. आणि मागितलेला पैसा त्यानें तावडतोब दिला नाहीं, म्हणून एक लाख रुपये त्याला दंड केला. हा सगळा पैसा वसुलांत आणण्यासाठीं

त्यानें एकदम स्वार रवाना केले. त्यांनीं तितकीही रकम सक्ती करून त्या बिचाऱ्या गरीब कुळापासून घेतली आणि हेस्तिंग साहेबास दिली. तेवढ्यानें-ही तो तृप्त झाला नाहीं. कांहीं तरी कुरापत काढून त्या राजाचें घर धुऊन न्यावें असें त्याच्या मनांत होतें. म्हणून तो वारंवार मोठमोठ्या रकमांचीं मागणीं करूं लागला. तेव्हां राजानें वीस लक्ष रुपये त्याची मर्जी राखण्यासाठीं त्याजकडे पाठविले. तेव्हां हेस्तिंग साहेब बोलला कीं, यांनीं आमचें काय होतें ? आम्हांला आणखी पुष्कळ पैसा दिल्यावांचून आम्हीं कधीं ऐकणार नाहीं. राजाजवळची सगळी दौलत बुचाडून घेऊन शिवाय काशीप्रांत अयोध्येच्या नवा-बास विकून त्याचीही किंमत घ्यावी, असें हेस्तिंग साहेबाच्या मनांत आल्यावरून तो स्वतः काशीस गेला. तेव्हां चैतसिंगानें तीस कोस पुढें सामोरें येऊन त्याचीं पुष्कळ आर्जवें केलीं; परंतु तो कांहींच ऐकेना. शेवटीं त्यानें आपलीं सर्व मागणीं राजाकडे लिहून पाठविलीं. त्यांजवर राजानें अनेक सबबी दाखवून मोठ्या नम्रपणानें उत्तर दिलें. हें पाहून हेस्तिंग साहेबाला फार संताप आला. त्यानें राजास आपल्या लोकांकडून एकदम कैद केलें. हें पाहून शहरांतील लोक बिथरले, आणि आपल्या राजाच्या सुटकेकरितां हत्यारबंद होऊन आले. ते थोडे होते म्हणून त्यांचें कांहीं चाललें नाहीं. कितीएक प्राणांस मात्र मुकले. राजा आपल्या नौकरांच्या पा-गोट्यांनीं वाड्यांतून खालीं उतरून नदीपार झाला.

आणि तेथून त्यानें हेस्तिंग साहेबास नजराणे व विनंतीपत्रें पाठविलीं. त्यांजकडे त्यानें ढुंकून देखील पाहिलें नाहीं. तो एका वाड्यांत फक्त ५० लोकांनिशीं होता. आणि बाहेर शहरच्या हत्यारबंद लोकांचा मोठा दंगा चालला होता तरी तो एक लवही घाबरला नाहीं. जवळच्या इंग्लिश छावणींतून कुमक आणविण्याकारितां त्यानें तिकडच्या अधिकाऱ्यांस पत्रें लिहिलीं, आणि तीं उघडपणें कोणी जाऊं देणार नाहीं म्हणून त्यांच्या बारीक गुंड्या करून त्या एतद्देशीय शिपायांच्या कानांच्या भोंकांत घातल्या, आणि ह्या रीतीनें दंगेखोर लोकांतून आपलीं पत्रें छावणींत पोहोंचविलीं. तिकडून एक अविचारी मनुष्य कांहीं लोक बरोबर घेऊन आला आणि शहरच्या लोकांवर पडला, त्यांनीं त्याचा पराभव करून त्याला ठार मारिलें.

हें ऐकून राजास थोडासा धीर आला आणि तितक्यांत तो गुरकावणीच्या गोष्टी सांगूं लागला; परंतु त्याचे किल्ले वगैरे इंग्लिशांनीं लवकरच घेऊन त्यास हतवीर्य केलें. आणि तो तेव्हां जो पळाला तो पुढें कोणाच्याही नजरेस पडला नाहीं. त्याचें राज्य इंग्लिशांनीं आपणाकडे घेऊन त्याच्या गादीवर त्याचा कोणी नातलग कांहीं पेनशन ठरवून देऊन नांवाचा राजा करून बसविला. ह्या राज्यक्रांतीनें इंग्लिशांस वीस लाख रु० उत्पन्नाचा मुलूख मिळाला. त्याच्या खजिन्यांत निदान दोन कोट तरी रुपये सांपडावे असा हेस्तिंग साहेबाचा अजमास होता तो फसला. सगळे २५ लक्ष रु० सांपडले. ते देखील हेस्तिंग

साहेबाच्या हातीं लागले नाहींत. तर लष्करी लोकांनीं बक्षीस म्हणून आपसांत ते वांटून घेतले, तेव्हां रोकड मिळविण्याचे आपले श्रम व्यर्थ गेले, असें पाहून हेस्टिंग साहेबास फार वाईट वाटलें.

तेव्हां पैसा उत्पन्न करण्यासाठीं, त्यानें अयोध्येचा दुर्बल नबाब असफ उद्दवला, याशीं मागणें लाविलें. त्या उभयतांची चुनारगड मुक्कामीं गांठ पडली. तेव्हां नबाबानें त्याला उघडपणें असें सांगितलें कीं, मजजवळ कांहीं द्रव्य नाहीं; परंतु माझ्या आईजवळ व आजीजवळ पुष्कळ पैसा आहे तो कोणत्या तरी युक्तीनें काढून घेऊन आपल्या गरजा भागवाव्या. हें हेस्टिंग साहेबास खरें वाटलें, आणि त्यानें त्या बायांकडील गांव जप्त करण्याविषयीं प्रथमतः हुकूम पाठविला. त्यांचे नवऱ्याच्या वेळचे दोन कारभारी होते त्यांस एकदम कैद करून त्यांच्या पायांत बिड्या घातल्या, आणि काशीच्या दंग्याच्या वेळीं जी अयोध्या प्रांतांत गडबड झाली ती सगळी तुम्हींच केली, असा त्यांजवर आरोप आणून त्यांस त्यांच्याच दिवाणखान्यांत उपाशीं कोंडून ठेविलें; आणि हाणमार करून त्यांजपासून एक कोटि वीस लक्ष रुपये काढिले.

पुढें थोडक्याच वर्षांनीं सदरील सर्व गोष्टींचा पार्लमेंट सभेंत विचार झाला, आणि काशीच्या राजाच्या व अयोध्येच्या बेगमेच्या कामांत मोठा अन्याय झाला असें सर्वांच्या नजरेस आलें. नंतर इलायझा इंपीस व हेस्टिंग साहेब यांस स्वदेशीं परत

बोलवावें असें ठरलें. त्याप्रमाणें हुकूमही रवाना झाले. ते पोंचतांच इंपी मात्र तावडतोब निघून गेला; परंतु हेस्तिंग साहेबास प्रोप्रायटर लोकांचा आंतून चांगला वाशिला होता म्हणून तो सन १७८५ चे बरेच महिने लोटतपर्यंत आपल्या कामावर तसाच राहिला होता; पण मग लवकरच काम सोडून निघून जाणें त्याला भाग पडलें.

येथें त्याची हिंदुस्तानांतील कारकीर्द संपली. तो या देशांत असतां वहुतकरून चोहींकडे दंगे चालले होते; परंतु गेला तेव्हां हैदर मेला होता, टिपूशीं तह ठरला होता आणि मराठेही जर्जर होऊन वाटेवर आले होते, तेणेंकरून सर्वत्र शांतता होती. तो येथून निघून विलायतेस पोंचेपर्यंत गलवता-मध्यें आपला बहुतेक काल ग्रंथावलोकनांत घालवीत असे. तो इ० सन १७८५ च्या जून महिन्यांत स्वदेशीं पोहोंचला. तेथें राणीनें व डायरेक्टर लो-कांनीं त्याचा चांगला सत्कार केला.

पुढें थोडक्याच दिवसांनीं त्याची चौकशी कर-ण्याविषयीं वर्क साहेबानें सूचना दिली; व हिंदुस्ताना-च्या राज्यकारभाराचे कागदपत्र पाहून त्यानें त्याज-वर दोषारोपण केलें. त्यानंतर पुष्कळ सभांमध्यें त्याविषयावर वादविवाद होऊन हेस्तिंग साहेवास समोर आणून चौकशी करावी, असें ठरलें. ती चौकशी १७८८ च्या फेब्रुआरी महिन्यांत सुरू झाली. ती राहून राहून सुमारें ७ वर्षे चालून शेवटीं १७९५ त तिचा शेवट झाला. तितक्या अवकाशांत बेर्डन,

बर्क, दंदास इत्यादि वक्त्यांनीं मोठमोठीं संभाषणें करून, तो पुष्कळ अंशीं दोषी आहे असें सिद्ध केलें, तरी ज्यानें आपल्या राज्यासाठीं इतकीं संकटें भोगिलीं त्यास छळावें हें आपणांस योग्य नाहीं असें बहुतांस वाटलें, आणि एका सभेंत थोडकेच सभासद जमले होते, त्या वेळीं त्याचा खटला काढून त्यास दोषमुक्त केलें. त्याच्या हातून जशीं वाईट कामें घडलीं आहेत तशीं चांगलींही घडलीं आहेत असें लोक म्हणूं लागले व राजाच्याही मनांत आलें. चौकशी सुरू होती तेव्हां त्याची नापत व विटंबना झाली ती त्याच्या पदवीस अगदीं अयोग्य असें सर्वांस वाटूं लागलें. तेणें करून मग त्याचें पुन्हां थोडेंसें वजन पडलें. नंतर त्याला प्रिव्ही कौन्सिलरचें काम दिलें.

शेवटीं त्यानें आपल्या बाळपणच्या निश्चया-प्रमाणें देलसफोर्द येथें आपलीं शेवटचीं २० वर्षें घालविलीं; आणि आपलें नांव तेथें गाजविलें. तो इ० स० १८१८ च्या आगस्ट महिन्याच्या २१ व्या तारखेस मरण पावला.

धैर्य आणि साहस हे गुण या पुरुषामध्यें चांगले वसत होते, याविषयीं मागें लिहिलेल्या गोष्टींवरून खातरी होईलच; परंतु धैर्याविषयीं त्याची आणखी एक गोष्ट पुस्तकांतून लिहिली आहे ती अशी कीं, फक्त ५० लोकांनिशीं जेव्हां तो काशीमध्यें दंगे-खोर लोकांकडून वेढला गेला होता तेव्हां त्यानें शिपायांच्या कानांतून मदत मागण्याचीं पत्रेंच केवळ पाठविलीं असें नाहीं, तर त्याच शिपायां-

बरोबर आपल्या सुरक्षितपणाविषयीं आपल्या प्रिय- पत्नीस पत्र व मराठ्यांशीं तह करण्याच्या ठरावाची याद हीं स्वस्थ चित्तानें निर्मळ लिहून रवाना केलीं होतीं; यावरून तो किती धैर्यशाली होता हें सहज लक्षांत येईल. तो आपल्या बायकोवर फार प्रीति करीत असे, तो फार लोभी नव्हता, दप्तरी जमाखर्च व इनसाफी काम, यांजमध्यें त्याच्या अमदानींत त्याचा हात कोणाच्यानें धरवला नाहीं. त्याची लिहिण्याची शैली फारच सरळ असे. फारशी व आरबी या भाषांत त्याची चांगली गति होती. संस्कृत त्याला येत नव्हतें; परंतु देवभोळ्या ब्राह्मण लोकांच्या हातून युक्तिप्रयुक्तीनें वेदादि पुस्तकें काढून त्यानेंच युरोपि- यन विद्वानांच्या हस्तगत केलीं. लोकांत आपलें तेज पाडण्याचा गुण याच्या ठायीं फार विलक्षण होता. बंगालच्या आसपासच्या राष्ट्रांत पैसा उत्पन्न कर- ण्यासाठीं पुष्कळ जुलूम केला; परंतु खुद्द बंगाल्यास बिलकूल ढका लाविला नाहीं, तेणें करून तो तेथच्या लोकांस अगदीं आईबापासारखा कृपावंत वाटे, व तोही त्यांजवर फार प्रीति करीत असे, तो निघून गेला तेव्हां त्यांला फार वाईट वाटलें; व आपली त्याला आठवण राहावी म्हणून, त्यांनीं त्याला पुष्कळ नजराणे व मानपत्रें दिलीं. तो त्यांस इतका प्रिय वाटत असे कीं, त्यांच्या बायका त्याच्या गुणांच्या ओंव्या गात असत; त्यांपैकीं हल्लींही तिकडे पुष्कळ कानीं पडतात.

**समाप्त.**

# रसिकजनांस प्रार्थना.

---

## आर्या.

सद्भक्त पूज्य भावें, हरिचरणा अक्षता जशी वाहे ।
ही लघुनिबंधमाला, प्रेमें सुज्ञांस अर्पिली आहे ॥ १ ॥

## श्लोक.

कृपा करुनि ते हिला धरितिल स्वहस्तीं जरी,
अनंत उपकार मी मनिं गणीन त्यांचे तरी ।
अया परिस लागतां कनकता तयाला मिळे,
म्हणूनि विनवीतसें रसिकहो न हें आगळें ॥ २ ॥